नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका



मुद्रक-प्रकाशक
**डॉ. माधवी वैद्य,** प्रमुख कार्यवाह
**महाराष्ट्र साहित्य परिषद,** टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.
संगणकीय अक्षरजुळणी, मुद्रणस्थळ
**जंगम ऑफसेट प्रा. लि.,** २५/१० नांदेड फाटा,
सिंहगड रस्ता, पुणे - ४११ ०४१
**किंमत १५/- रुपये**
प्रकाशन : जून २००८

*या अंकात व्यक्त झालेल्या विचारांशी संपादक आणि संपादन-समिती, सल्लागार मंडळ अथवा प्रकाशक सहमत असतीलच, असे नाही.*

संपादकीय

# युगधर्माचे कर्ते भाष्यकार– समर्थ रामदास



डॉ. सु. प्र. कुलकर्णी

*'निशिदिनी जनचिंता लागलीसे उदारा !'*

हा समर्थ रामदासांच्या वाङ्मयाचा निदिध्यास आहे.

सुमारे पावणेचार हजार अभंग, साडेपाचशे लघुकाव्ये, साडेपंधराशे अष्टाक्षरी, लघुप्रकरणे, प्रवोध, तीन हजार प्रासंगिक काव्ये,७७५१ ओव्यांचा दासबोध, साडेतीन हजार पद-पदांतरे, मनोबोध, करुणाष्टके, रामायण, या ग्रंथसागरातून लोकोद्धाराची तळमळ आणि ध्यास शब्दाशब्दातून प्रत्ययाला येतो. १८०० मठांची स्थापना करून या सामर्थ्यसंपन्न भक्तिसंप्रदायाचा प्रचार करणारे समर्थ रामदास युगधर्माचे कर्ते भाष्यकार होते.

जीवनाच्या प्रत्येक पावलावर यशस्वीच कसे व्हावे, दुबळेपणावर मात कशी करावी. जे जे उत्कट भव्य आहे त्याची ओढ मानवाला लागली पाहिजे. जीवनाला मिळमिळीत करणारे सर्व टाकावे. उत्तम गुणांनी जीवनाला अलंकृत करावे. काही मानवी आवाक्याबाहेरच्या गोष्टींची उणीव 'काहीतरी आगंतुक गुणाची सोये' धरून भरून काढावी. व्यक्तिमत्त्व आदर्श करावे. 'सर्वामुखी मंगल बोलवावे' ऐहिकाची कांस धरावी, आणि पारलौकिकही मिळवावे.

प्रपंची भाग्य मिळवावे, आणि परमार्थी वैराग्य जतन करावे. संकटात 'घडि घडि बिघडे हा निश्चयो अंतरीचा' अशी मनाची अवस्था डळमळीत झाली की, 'मना सज्जना'ला परोपरीने– समजावून त्याला सतत कर्मयोगाच्या मार्गावर ठेवणे. अशी जीवनकला समर्थांनी शिकविली. दुबळेपणावर मात करणे हा मावनाचा गौरव आहे. स्वर्ग-मृत्यू-पाताळ सर्व काही पृथ्वीवरच आहे–

*गड कोट पुरे पट्टणे । नाना देश कळती अटणे ।*
*देव दानव मानव राहणे । पृथ्वीवरी ।।*

मानवातील देवरूप, दानवरूप आवि दुबळे मानवरूप या सर्वांचा अवतार पृथ्वीवरच आहे.

समाज जेव्हा भ्रष्ट होतो, भ्रमाने किंवा भीतीने कुमार्गाला लागतो. 'वाजे पाऊल आपुले, म्हणे मागुति कोण आले.' अशा संभ्रमित समाजाला मार्गावर आणणे; हा संतांचा ध्यास होता. शतकोटी अभंगाच्या संकल्पाने महाराष्ट्राच्या मनाला चारित्र्यसंपन्न केले. त्याला सामर्थ्याची जोड देणे ही काळाची गरज होती. समाजाची नैतिकता ब्राह्मणवर्गाने राखायची तेच भ्रष्ट झाले. दुष्टांचे निर्दालन करण्यासाठी ज्यांनी आपले खड्ग उगारायचे ते स्वकीयांवरच जुलूम करू लागले. संकटकाळी उत्तम व्यवहाराने धन जोडायचे ते वैश्य साठेबाजी आणि सावकारी करून समाजाला दुष्काळातही नाडू लागले. मग दामाजीला कोठार लुटवावे लागले. शिवाजीला स्वकीयांवरही शस्त्र उगारावे लागले. कोदंडधारी राम हे त्या युगाचे दैवत झाले. त्याचा दास, हनुमानाचे सामर्थ्य, आदर्श झाले. नाथांच्या भावार्थरामायणातील आणि समर्थांच्या युद्धकांडातील राम हाच महाराष्ट्रधर्माची प्रेरणा होता. शिवाजी-तुकाराम-रामदास हे या महाराष्ट्र धर्माचे आधार व प्रेरणा ठरले.

*धीर्धरा धीर्धरा तकवा, हडबडू गडबडू नका ।*
*काळ पाहोनि वर्तावे, भय सांडावे चित्तीचे ।।*

अशी आश्वासक भूमिका देणारे शब्द मरगळलेल्या



अनुक्रमणिका

आणि भयभीत समाजाला संजीवनी देणारे होते. तुकोबापर्यंतच्या संतांनी, साध्या भोळ्या 'भले तरी देऊ कासेची लंगोटी नाठाळाच्या माथी हाणू काठी' अशा कणखर आणि सश्रद्ध समाजाला, 'पुंडलीक वरदा हरी विठ्ठल...' बरोबर– 'जय जय रघुवीर समर्थ' ने इहवादाचे महत्त्व शिकविले.

'काळ पाहोनि वतवि' शक्ती-युक्तीने सावध असावे, 'अभ्यासे वतवि, भक्तिपंथेचि जावे', उत्तम गुण अंगिकारावे. गुणीजनांचे संघटन असावे, मना सज्जनाला समजवावे आणि 'आनंदवन भुवनाचे' स्वप्न पहावे.

*'समर्थाचिया सेवका वक्र पाहे*
*असा सर्व भूमंडळी कोण आहे ।'*

ही गर्वोक्ती नसून ठाम आत्मविश्वासासाठी एका दृढ समाजधारणेची घोषणा ठरली.

समर्थांचे साहित्य हे युगायुगांच्या युगधर्माचे भाष्य आहे. तोच युगायुगांचा धर्म आहे. समर्थ रामदास हे अशा युगधर्माचे कर्ते भाष्यकार म्हणून त्यांच्या साहित्यातून आणि कार्यातून दिसतात. आजही त्यांची जीवन भाष्ये मार्गदर्शक आहेत. चौथ्या जन्मशताब्दीनिमित्त त्यांचे हे विशेष स्मरण !

संपादक

---

## महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या घटनेसंबंधी निवेदन

महाराष्ट्र साहित्य परिषदेची विद्यमान घटना १ जानेवारी २००१ पासून अमलात आली आहे. ही घटना आता नव्या रूपात येणे आवश्यक आहे. १९१२ पासून वेगवेगळ्या कारणांनी घटनेचे स्वरूप बदलत गेले आहे. श्रीमंत सयाजीराजे होळकर महाराजांनी परिषदेला रु. दहा हजार मात्रची देणगी दिली त्या 'ट्रस्ट डीड' मध्ये काही नियमांचा उल्लेख आहे. औंधचे पंतप्रतिनिधी यांनी, पंतांच्या गोटातील, विद्यमान इमारत उभी असलेली पूर्वीची बखळ असलेली जागा, काही अटींवर देऊ केली. त्यात म. सा. परिषदेसंबंधित काही त्रोटक नियमावली होती. १९३२ च्या पुनर्घटना समितीने आणि नंतर १९४५ च्या एकात्मता-समितीने घेतलेल्या सभांमधून वेळोवेळी दुरुस्त्या झाल्या. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या दि. २४/९/२००० आणि १ जानेवारी २००१ च्या सभांमध्ये चर्चा होऊन, विद्यमान घटना तयार झाली आहे.

सदर घटना मुंबई सार्वजनिक विश्वस्त अधिनियम १९५० नुसार उद्दिष्टे, साधने, सभासदत्व, पदाधिकारी-समिती, कार्यकारी मंडळ, निवडणूक नियम इत्यादींचा सर्वांगाने फेरविचार करण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे. तसेच संस्था नोंदणी अधिनियम १८६० मधील 'उद्दिष्टे आणि नियमावली' या रचनेचा विचार केला पाहिजे. यांचा समन्वय साधून संस्थेचे कामकाज अधिक नीटनेटकेपणे चालण्यासाठी नवी घटना समिती नेमली आहे.

सभासदांना या निवेदनाद्वारे विनंती की, त्यांनी आपल्या सूचना, निमंत्रक श्री. रत्नाकर कुलकर्णी, साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ३०, या पत्त्यावर पाठवाव्यात.

आपले,

| डॉ. सु. प्र. कुलकर्णी | रत्नाकर कुलकर्णी | राजा फडणीस |
| --- | --- | --- |
| (मसुदालेखन-सदस्य) | (निमंत्रक) | (अध्यक्ष) |

(महाराष्ट्र साहित्य परिषद- घटना दुरुस्ती समिती)



अनुक्रमणिका

□

# वरी नव्हे, अंतरी !
# समर्थ रामदास आणि महाराष्ट्र धर्म

□



विवेक कृ. घळसासी

देवगड आंब्याचे कलम, कुठेही लावले तरी फळ येते. चव मात्र खुद्द देवगडच्या आंब्यासारखी नसते. 'शेवटी मातीचा म्हणून काही गुण असतोच!' असे म्हणून देवगडच्या मातीला आपण मान देतो. मातीचा गुण, जसा पीकांवर परिणाम करतो; तसा परिणाम त्या मातीशी एकरूप असलेल्या मनांवरही होत असावा. महाराष्ट्राच्या माती-पाण्याचा असा गुण म्हणजेच महाराष्ट्र धर्म ! अस्सल मराठी माणसाच्या आवडी-निवडी बऱ्यापैकी एकसारख्या असतात. प्रत्येक राज्य-प्रांताचाही असा एक स्वभाव असतो. अर्थात् हे म्हणताना या विधानाची मर्यादाही लक्षात घ्यायलाच हवी. तरीही मोठ्या प्रमाणावर या विधानाची प्रचिती घेता येऊ शकते. अशा महाराष्ट्र धर्मात 'रणभूमी-रंगभूमीवरचे प्रेम' हा ठळक गुण जसा जाणवतो तसाच 'टाळ आणि चाळ' यांच्या तालठेक्यावर समान श्रद्धेने डोलणे हाही गुण जाणवतो. 'वडा-पाव-मिसळ' या सप्ताक्षरी मंत्राने ज्याची रसना द्रवते, तो जसा मराठी माणूस; तसेच 'झुणका भाकर' या षडाक्षरी मंत्राचा ज्याच्यावर चटकन् परिणाम होतो तोही मराठी माणूस असतो. गोडापेक्षा तिखटावर जीव जडवणारा अन् नखऱ्यापेक्षा निखाऱ्यांवर भाळणाराही मराठी माणूस असतो. या आणि अशा अवघ्या महाराष्ट्र धर्माचे अधिष्ठान ठरू शकेल असा गुण म्हणजे कमालीचा अनौपचारिकपणा !

ही अनौपचारिकता कधी सहजतेच्या सोज्वळ कपड्यात वावरते; तर कधी रांगडेपणाचा लंगोट कसून शड्डू ठोकून उभी असते. मराठी सरळपणा कधी नटवा होत देहाला नागमोडी हेलकावे देऊ लागतो, पुणेरी बाजाचा झाला की तो आपल्याला रिझवतो आहे, की आपली जिरवतो आहे, हेच उमगत नाही. हेच सरळपण वैदर्भीय ढंगाने आपल्यासमोर आले तर अगत्याच्या हाताला (खरे तर पंजाला !) आग्रहाची नखे कधी फुटतील हे समजणार नाही. वरपांगी गुदगुल्या होताना दिसतात; आणि आपण मात्र रक्तबंबाळ होतो !

असे असले तरी अकृत्रिम, अनौपचारिक वृत्तीलतेला आधार मात्र मराठी संतांचा आहे. ऊस डोंगा असला तरी रस डोंगा नसल्याने 'वरलिया' अंगाला भुलू न देण्याची चोख मात्रा चोखोबांनी दिली. तुकोबांनी ती अधिक सरळ केली. गर्भार असल्याचे सोंग वांझोटीने वठवले तरी तिला पान्हा कसा फुटणार ? त्यामुळे सोंगाढोंगाला बळी न पडण्याचा मराठी निर्धार अधिक पक्का झाला. समर्थ रामदासांनी तर संपूर्ण सूत्रच हाती दिले. 'वरी चांगला अंतरी गोड नाही । तया मानवाचे जिणे व्यर्थ पाही ॥' अशा चरणांवर मराठी मन नेहमीच समर्पित असते. जरी आविष्कारात विविधता असली तरी महाराष्ट्र धर्माला सरळपणाचे, अनौपचारिकतेचेच अधिष्ठान आहे, हे स्पष्ट होते.

वरचा चांगुलपणा हा फसवा असतो. सध्या मात्र असा दिखाऊपणाच वरचढ होऊ लागला आहे. आत 'चांगलेपण' असेल तर अशा वरपांगीच्या नट्ट्यापट्ट्याला काही अर्थ उरत नाही. आतला चांगुलपणा असेल आणि वरतीही देखणेपण असेल तर आणखी काय हवे ! समर्थ सांगतात, 'वरी चांगला अंतरी

गोड आहे । तयालागी कोणीतरी शोधताहे ॥' समर्थ आवरणाच्या ऐश्वर्याला नाकारत नाहीत. आकर्षणापुरते आवरणाचे मोल असतेच, आस्वादासाठी 'अंतर'च महत्त्वाचे असते. अंतरीचा गोडवा म्हणजे चारित्र्य ! शुद्धता, शुचिता असेल तर हा आतला गोडवा निर्माण होतो आणि वाढत जातो. जीवनाच्या ध्येयनिश्चितीने ज्याचे चिंतन शुद्ध असल्याचे स्पष्ट होते, आचरणातील पारदर्शिकतेने ज्याचे वर्तन सुखदायी होते; आणि चिंतन, वर्तनाला बोलण्यातील खरेपणाची जिथे साथ असते, तेथे अंतरीचा गोडवा आहे हे सांगण्यासाठी विपणन विभागाची आवश्यकता नसते.

अशी पूर्ण विकसित व्यक्तित्वे समाजाला आवडतात. समर्थ जेव्हा 'तयालागी कोणीतरी शोधताहे' म्हणतात तेव्हा दोन बाबी ते स्पष्ट करतात. अंतरीच्या गोडीची चटक आणि आवश्यकता जाणविल्यानेच 'तयालागी' कुणी शोधत आहे ही एक बाब, आणि अशी व्यक्तित्वे दुर्मिळ आहेत ही दुसरी बाब ! याचाच अर्थ आपण अशा दुर्मिळातील एक असले पाहिजे. कारण 'वरी चांगले आणि आत वांगले' असे जगणाऱ्याचे 'जिणे व्यर्थ' असल्याचे समर्थ निक्षून सांगतात. दुर्लभ असा मनुष्य जन्म आपणास प्राप्त झाला आहे. तो व्यर्थ जाऊ द्यायचा नसेल तर मग रूपाला न भुलता स्वरूपाला भिडले पाहिजे. असे भिडायचे तर मग भीड काय कामाची ? राकट, कणखर, दगडांच्या देशाला हे आवडले; आणि त्याने ते धर्मतत्त्व म्हणून स्वीकारले. समर्थ जेव्हा 'अंतर पारख दे रामा !' म्हणतात तेव्हा ते इतरांचेच अंतर नसते. आधी स्वतःचे अंतर पारखता यायला हवे; मगच इतरांचे अंतर पारखता येते.

जग ज्याचा शोध घ्यायचा खटाटोप करीत आहे तसे होण्यातच माणसाच्या जगण्याचे सार्थक आहे; असे समर्थांचे सांगणे आहे. आपला जन्म तसे होण्यासाठीच आहे. ज्या कामासाठी आपली (निर्मिती आणि) नेमणूक आहे ते करण्यातच आपली सार्थकता आणि आपले हित आहे. 'आपुलिया हिता जो होय जागता । धन्य माता-पिता तयाचिया ॥' या जगद्गुरू तुकोबारायांच्या वचनाचा अर्थही हाच आहे. आता प्रश्न असा पडतो की अंतरी गोड कसे व्हायचे? समर्थांनी त्याचा मार्गही दाखविला आहे. 'कोमल वाचा, विमल करणी, बहुजन मैत्री' या तीन गोष्टी करुणाष्टकात समर्थांनी श्रीरामाकडे मागितल्या आहेत. ज्याच्याजवळ 'अंतर पारखी'सह या तीन गोष्टी आहेत, त्याचे अंतःकरण म्हणजे अंतर गोड आहे हे उघडच आहे. पण आपल्या अंतरी असे गोडपण आल्याचे प्रमाणपत्र आपणच आपणाला द्यायचे का ? समर्थांनी याचेही उत्तर दिले आहे. आपल्या अंतरीचा गोडवा इतरांना जाणवला

पाहिजे. समर्थ म्हणतात,

*'भला रे भला बोलती ते करावे ।*
*बहुता जनींचे मुखी येश घ्यावे ॥'*

इतरांनी आपल्या गोडव्याने संतुष्ट होऊन प्रशस्तीची थाप त्यांनी द्यायला हवी.

समर्थ, मैत्रीचा पुरस्कार करतात. अनंत ओळखीने अनंत यश मिळते ही त्यांची शिकवण आहे. *'राखावी बहुतांची अंतरे । भाग्य येते तदनंतरे ॥'* ही समर्थश्रद्धा आहे. त्याचवेळी 'यत्न तो देव जाणावा' हे सांगायला ते विसरत नाहीत. प्रयत्नानेच सर्वांशी मैत्री होते. सर्वांना सांभाळता येते. अशक्य, अप्राप्य असे काहीही नसते, हा दुर्दम्य आशावाद त्यामागे आहे. *'केल्याने होत आहे रे । आधी केलेचि पाहिजे ॥'* हेही समर्थ सांगतात. अंतरी गोडवा निर्माण व्हायचा तर संकुचितता, क्षुद्रता सोडली पाहिजे. दिव्य, उत्कट घेण्याचा आणि अवघे मिळमिळीत टाकण्याचा ते आग्रह धरतात. समर्थांना शक्तीची ओढ आहे. धीर, तकावा याची जोड आहे. असे पाहिले तर जाणवते की महाराष्ट्र स्वभावधर्माचा सहजोद्गार (तसा एकूणच संतांच्या—) समर्थ रामदासांच्या रचनांत आहे. अन् तसे पाहिले तर दिसते की अशा उद्गारांनी महाराष्ट्र धर्म घडला आहे. बस्, पाहताना आपण कोणत्या दिशेला उभे आहोत, एवढाच काय तो फरक !

राष्ट्रसंत समर्थ रामदासांचे वेगळेपण कुठे आहे ? तर इथून पुढे आहे. 'सर्व विषयी सावधपणा' बाळगण्याचा वेगळेपणा जसा समर्थांचा तसाच 'घटाशी घट । उद्धटासी उद्धट' होण्याचा बाणाही समर्थांचा. बाणा पुन्हा एकूण महाराष्ट्र धर्माचा पण सावधपण मात्र खास समर्थांचेच ! महाराष्ट्राने जे आणि जेव्हा गमावले तेव्हा हे सावधपणच सुटले होते. बाणा कमी नव्हता पडला. 'मोजुनी माराव्या पैजारा'चा बाणा तुकोबारायांचा मराठी मन कसा विसरेल? 'अरे मेल्या, मायेच्या कारट्या' असे म्हणत पदर खोचून थेट विठोबाची गच्ची पकडणारी जनी (तीही दासी !) कशी विसरता येईल. पण यातही सावधपण हवे हे समर्थांनी ओळखले. इतर सर्व गुणवत्तेने अंतरी गोडवा निर्माण होतो. सावधपणाने तो गोडवा कायमचा टिकून राहतो.

महाराष्ट्र धर्माची प्रभा एवढीच झळाळून थांबत नाही. उजळायला ती आणखी नभ शोधते. समर्थांनी ती उर्मी फार ठसठशीतपणे मांडली आहे. 'बहुता जनाचे मुखी येश' घेण्यासाठी 'देव मस्तकी' धरून अवघा हलकल्लोळ करावा' असे सांगून ते म्हणतात *'परी शेवटी सर्व सोडूनी द्यावे ॥'* महाराष्ट्र धर्माचा हा कळस आहे. गायनी कळा असावी, वक्तृत्व कळा असावी. नाना पराक्रम करावे. त्रिखंड भेदून श्रीरामकथा न्यावी. आनंद वनभुवन उभे रहावे. सगळे करून जणू हे आपले नाही असे म्हणून सरळ उठून जावे. 'झडझडोनि वाहिला निघ' असे याचसाठी ज्ञानोबाराय म्हणतात. परम वैभवशाली *शिवरायास आठवावे । जिवित्व तृणवत् मानावे ॥'* यात इतिहासाचा गौरव करीत वर्तमानाला नगण्य मानण्याची प्रवृत्ती नाही. उलट *'याहुनी करावे विशेष । तरीच म्हणावे पुरुष ॥'* असा जळजळीत पुरुषार्थ आहे. तरीही शेवटी सर्वच सोडण्याचा आदेश आहे. *'पोरं लेकरं कमावती झाली का म्या हरिहरि म्हणत बसायला मोकळा हुतो बगा।'* असा म्हराटी धर्म म्हणजे शेवटी सर्व सोडून निघायची तयारी करणे. विक्रम आणि वैराग्याचे मनोहारी मिश्रण अन्य कुठे सापडणार ?

महाराष्ट्र धर्माची ही मूळ गुणसूत्रे केव्हाचीच आहेत. वेगवेगळ्या काळी ती वेगवेगळ्या व्यासपीठावर प्रकटली. त्या वेळच्या प्राकट्याच्या माध्यमाच्या मगदुराप्रमाणे ही गुणसूत्रे प्रकट झाली. संतापुरता विचार करताना हेच जाणवते. आणखी एक जाणवते की इतर कोणाहीपेक्षा संतांनी आणि शाहिरांनीच महाराष्ट्र धर्म जोजवला, जोपासला. समर्थ रामदास हे राष्ट्राचा विचार करताना संत कमी शाहीर अधिक होत आणि रामाचा विचार करताना संतच असत. 'समुदायाचा हव्यास' तरीही 'एकांती चाळणेचा' ध्यास. वैराग्याचा उद्घोषक तरी प्रपंचाला पोषक. 'मुलांच्या चालीने' चालणारा पिता तरी ब्रह्मांडाभोवती वेढे घालणारा कर्ता. अशा समर्थांच्या जन्म चतुःशतीच्या पर्वात त्यांचे स्मरण करताना, त्यांच्या साहित्याची उपासना करताना, आपणच आपल्याला भेटतो आणि 'पाहे आपणासी आपण । या नाव ज्ञाना ॥' हे समर्थांचे सांगणे तंतोतंत पटते.

❖❖❖

**विवेक कृ. घळसासी**
१५, वामननगर, जुळे सोलापूर - ४१३ ००४
दूरभाष : ०२१७ २३०१६८३



अनुक्रमणिका

□

# समर्थांचे राजकारण...

□

सुनील चिंचोलकर



समर्थ संप्रदायाची चतुःसूत्री पुढील प्रमाणे आहे.

*'मुख्य हरिकथा निरूपण । दुसरे ते राजकारण ।*
*तिसरे ते सावधपण । सर्व विषयी ॥*
*चवथा अत्यंत साक्षेप । फेडावे नाना आक्षेप ।*
*अन्याये थोर अथवा अल्प । क्षमा करीत जावे ॥'*

यावरून समर्थ रामदासांनी आपल्या संप्रदायात राजकारणाचा उघड उघड समावेश केला होता हे स्पष्ट होते. राजकारण शब्द कानावर पडला की आपल्या डोळ्यासमोर हेवेदावे, डावपेच वगैरे हीन गोष्टीच उभ्या रहातात. आपल्याला राजकारण म्हटल्यावर टिळक, गांधी, सावरकर यांची आठवण कधीच होत नाही. वस्तुतः आपली सगळी दैवतं, मग ते प्रभू रामचंद्र असोत अथवा भगवान श्रीकृष्ण असोत, राजकारणीच होते. राजकारण करणे म्हणजे मलीन होणे अशी चुकीची धारणा वर्तमान राज्यकर्त्यांनी जनमानसात करून दिली आहे. त्यामुळे एखादा संत राजकारणी असू शकतो हे स्वीकारणे आम्हाला जड जाते. समर्थ तर म्हणतात—

*'प्रवृत्तीस पाहिजे राजकारण ।*
*निवृत्तीस पाहिजे पंचीकरण ॥'*

प्रवृत्ती याचा अर्थ भौतिकवाद किंवा ईहवाद आणि निवृत्ती याचा अर्थ अध्यात्मवाद. माणसाला भौतिक जीवनात यशस्वी व्हावयाचे असल्यास राज्यशासन सक्षम आणि समर्थ हवे. समर्थांच्या काळात राज्यशासन जनतेला प्रतिकूल असल्यामुळे असे अन्यायी राज्य उलथवून न्यायी राजा प्रस्थापित करणे समर्थांना गरजेचे वाटले. मग त्यासाठी त्यांनी जे जे केले ते सारे राजकारण होय. ड्यूरांट हा पश्चिमेकडील विचारवंत म्हणतो— 'ज्यावेळी एखाद्या देशात राज्यक्रांती घडते त्यावेळी समाजमन त्या राज्यक्रांतीला अनुकूल करणारे काही विचारवंत आधी जन्माला येतात आणि मग राज्यक्रांती घडविणारा राजा निर्माण होतो.' म्हणून स्वातंत्र्यवीर सावरकर म्हणत— 'इटालीच्या स्वातंत्र्यलढ्यात जे काम जोसेफ मॅझिनी यांनी केले तेच काम समर्थ रामदासांनी शिवछत्रपतींच्या हिंदवी स्वराज्याच्या निर्मितीपूर्वी केले.'

'सामर्थ्ययोगी रामदास' या ग्रंथात प्रा. प्रभाकर पुजारी यांनी एक चांगला मुद्दा मांडला आहे. शिवछत्रपती अत्यंत तळमळीने आणि प्रामाणिकपणे हिंदवी स्वराज्याच्या निर्मितीचा प्रयत्न करीत होते. परंतु त्यांचे अनेक जवळचे आणि दूरचे नातलग मोगलांकडे सेवेत होते. अशावेळी शिवछत्रपतींच्या कार्याबद्दल जनमानसात विश्वासाची भावना निर्माण करण्यासाठी कुणा त्रयस्थ माणसाने प्रयत्न करणे आवश्यक होते आणि हा त्रयस्थ माणूस समाजावर प्रभाव पाडू शकेल असा असणे आवश्यक होते. समर्थांनी शिवाजी महाराजांचे वर्णन करताना 'यशवंत, कीर्तिवंत, सामर्थ्यवंत, वरदवंत, पुण्यवंत, जयवंत, नीतिवंत, आचारशील, विचारशील, दानशील, सुशील, धर्मशील' ही जी विशेषणे वापरली त्याचा उपयोग जनमानसात शिवछत्रपतींची प्रतिमा उजळ होण्यास निश्चित झाला असेल. महाराजांच्या राजकीय हालचाली पाठीमागचे हेतू नुसते शुद्ध असणे पुरेसे नव्हते तर ही शुद्धता लोकांच्या ध्यानी आणून देणारा तेवढ्याच ताकदीचा त्रयस्थ माणूस समाजात असणे आवश्यक होते. ते काम त्याकाळी

रामदास स्वामींनी केले. समाज संघटित करणें, लोकांच्या राजकीय जाणिवा जागृत करणे, गावा-गावांत काही नेते तयार करणे, समाजापुढे स्वातंत्र्याचे ध्येय ठेवणे, तरुणांना लष्कर भरतीची प्रेरणा देणे, सामूहिक स्तरावर धर्मनिष्ठा निर्माण करणे, प्रयत्नवादी समाज तयार करणे हा समर्थांनी केलेला सर्व उद्योग त्यांच्या 'राजकारण' या संज्ञेस पात्र आहे.

**शिवछत्रपतींच्या श्रेयाची काळजी :** समर्थांना राजकारणी म्हटल्यास त्यांच्या संतत्वाला बाधा येईल की काय या भीतीने सांप्रदायिक मंडळी समर्थांच्या राजकारणावर बोलायचे टाळतात. अन्य संप्रदायातील काही मंडळींनी तर समर्थांच्या राजकारणाची धास्ती घेऊन त्यांना संत मालिकेतून वगळण्याचे राजकारण केले. हा झाला सांप्रदायिक मंडळींच्या वैचारिक गोंधळाचा भाग. इकडे शिवचरित्रकारांना समर्थांच्या राजकारणाची चर्चा करताना हिंदवी स्वराज्याच्या निर्मितीतील शिवछत्रपतींच्या श्रेयाची काळजी लागून राहिलेली असते. समर्थांचा राजकारणी संत म्हणून स्वीकार करणे म्हणजे समर्थांनी शिवाजी महाराजांना मदत केली हे मान्य करणे आले. त्यामुळे शिवाजी महाराजांचे महत्त्व कमी होईल की काय अशी भीती या मंडळींना वाटते. किती दुबळी माणसे शिवचरित्राचा अभ्यास करतात हे यावरून ध्यानात येते. शिवाजी महाराजांना त्यांच्या कार्यात जर नेताजी पालकर, बाजी पासलकर, बाजीप्रभू देशपांडे ही मंडळी मदत करू शकतात तर समर्थ रामदास मदत करू शकणार नाहीत का ? 'होता जिवा म्हणून वाचला शिवा.' असे म्हटल्याने जर शिवाजी महाराजांना कमीपणा येत नाही तर समर्थांच्या कार्याचा शिवाजी महाराजांना उपयोग झाला हे मान्य केल्याने शिवाजी महाराजांना कसा कमीपणा येऊ शकतो ? बारावीला केंद्रात पहिला आलेला मुलगा आपल्या यशाचे श्रेय माता-पित्यांना किंवा गुरूजनांना देतो यामुळे त्या विद्यार्थ्याचे श्रेय काही कमी होत नाही. शिवछत्रपतींनी उभे केलेले कार्य एवढे भव्य आणि दिव्य होते, तसेच त्या कार्याला मोगलांचा एवढा कडवा विरोध होता की काही मंडळींची मदत घेतल्याशिवाय शिवछत्रपतींना यश मिळणेही शक्य नव्हते. रामाला सुद्धा रावणाशी लढताना वानरांची मदत घ्यावी लागली. काही सांप्रदायिक चरित्रकार समर्थांनी शिवाजी महाराजांना मदत केली हे सांगताना सारे श्रेय समर्थांच्या झोळीत टाकण्याचे प्रयत्न करतात हा देखील आचरटपणा आणि अपराध आहे. पुण्यश्लोक जिजाबाई आणि शहाजीराजे यांनी खऱ्या अर्थाने शिवाजी महाराजांच्या कार्याचा पाया रोवला हे आपल्याला मान्य करावे लागेल. तसेच समर्थांनी कितीही मदत केली असली तरी अफजलखान वध, शाहिस्तेखान मोहीम, आग्र्याहून सुटका या सर्व प्रसंगी स्वतः महाराजांनी कौशल्य पणाला लावले होते हे विसरून चालणार नाही. अनेक वेळा महाराजांनी स्वतःचा जीव धोक्यात घातला होता हे देखील नाकारता येणार नाही. तेव्हा समर्थांनी शिवछत्रपतींना मदत केली हे मान्य केल्याने शिवाजी महाराजांना कुठेही गौणत्व येत नाही; कारण हिंदवी स्वराज्याचे मुख्य शिल्पकार शिवाजी महाराजच आहेत. प्राचार्य शिवाजीराव भोसले म्हणतात त्याप्रमाणे हे दोघेही महापुरुष आपापल्या क्षेत्रात एवढे महान होते की ते सर्वार्थाने स्वयंभू आणि स्वतंत्र होते. त्या दोघांचे कार्य परस्परांना पूरक ठरावे हा नियतीचा संकेत होता. शिवछत्रपतींना समर्थांची मदत झाली हे जसे सत्य आहे, त्याचप्रमाणे समर्थांच्या मठांना स्वराज्यात राजाश्रय मिळाला हे देखिल खरे आहे. समर्थांचे महाराष्ट्रातील मठ जेवढे क्रियाशील होते तेवढे महाराष्ट्राबाहेरचे मठ क्रियाशील नव्हते ही वस्तुस्थिती मान्यच करावी लागेल.

**समर्थांचे राजकारण :** समर्थांनी 'राजकारण' हा शब्द 'चातुर्य' या अर्थाने वापरला असे कै. न. र. फाटक यांना वाटते. श्रीमद् दासबोधात 'चातुर्यलक्षण' नावाचे तीन समास आहेत तर 'राजकारण निरूपण' नावाचे दोन समास आहेत. जर चातुर्य हा शब्द राजकारणाला समानार्थी असेल तर समर्थांनी राजकारणाचे दोन स्वतंत्र समास का योजिले या प्रश्नाचे उत्तर देण्यास न. र. फाटक असमर्थ ठरले. त्याहून खरी गमतीची गोष्टी ही आहे की समर्थांनी अनेक ओव्यांमध्ये 'राजकारण' हा शब्द वापरला नाही पण त्या ओवीमध्ये पूर्ण राजकारणाचे सूत्र वापरले आहे. उदाहरणार्थ—

*'करणे असेल अपाये । तरी बोलोन दाखवू नये ।*
*परस्परेची प्रत्यये । प्रचितीस आणावा ॥*
*इशारतीचे बोलो नये । बोलायाचे लिहो नये ।*
*लिहायाचे सांगो नये । जबाबीने ॥'*

समर्थांनी ज्या ओवीत 'राजकारण' शब्दाचा वापर केला अशा ओव्या सत्तावीसच आहेत. पण ज्या ओवीमध्ये राजकारण शब्द न वापरता राजकारणाचा नियम सांगितला आहे अशा ओव्या शेकडो आहेत. १६४९ मध्ये शिवछत्रपतींना लिहिलेले 'निश्चयाचा महामेरू' हे पत्र तसेच १६८२ मध्ये संभाजी महाराजांना लिहिलेले 'अखंड सावधान असावे' हे पत्र आपल्याला हेच दर्शविते की समर्थ ३२ वर्ष राजकारणात क्रियाशील होते. एवढेच नव्हे तर औरंगजेबचा मुलगा अकबर १६८१ मध्ये बापाशी भांडून आश्रयासाठी स्वराज्यात आला तेव्हा त्याला आश्रय द्यावा की नाही या विषयी समर्थ आणि संभाजीराजे यांच्यात विचार विनिमय झाल्याची नोंद आहे. शिवाजी महाराजांना राज्याभिषेक झाला तेव्हा आपल्याला झालेला आनंद व्यक्त करताना समर्थ निर्भयपणे म्हणतात—

*'बुडाले सर्वही पापी । हिंदुस्थान बळावले ।*
*अभक्तांचा क्षयो जाला । आनंदवनभुवनी ॥*
*बुडाला औरंग्या पापी । म्लेंच्छ संहार जाहला ।*
*मोडिली मांडिली क्षेत्रे । आनंदवनभुवनी ॥'*

समर्थांचा महाराष्ट्र धर्म येथे 'हिंदुस्थान बळावले' या शब्दात व्यक्त होतो. महाराष्ट्रात अथवा हिंदुस्थानात राजसत्ता हिंदूंच्या हातात असली पाहिजे ही समर्थांची ठाम धारणा होती. राजा हा धर्माचा कैपक्षी असला पाहिजे असे त्यांना वाटत होते. त्याकाळचे यवन राज्यकर्ते आपला धर्म आणि संस्कृती नष्ट करण्यासाठी टपले होते. अशा वेळी समर्थांनी जनमानसात स्वदेश, स्वधर्म आणि स्वभाषा याबद्दलची अस्मिता निर्माण केली. तिकडे शिवाजीमहाराज तेच काम करीत होते. शिवछत्रपती आध्यात्मिक राष्ट्रवाद सांगत होते तर समर्थ राष्ट्रवादी अध्यात्म सांगत होते. शिवसमर्थ भेट झाली नव्हती हे जरी क्षणभर मान्य केले तरी राजकारणात यशस्वी होण्यासाठी शेकडो ओव्या लिहून समर्थांनी जे मार्गदर्शन केले आहे ते आज जगातील सगळ्या राजकीय पुढाऱ्यांना उपयोगी पडेल याबद्दल तीळमात्र संदेह नाही.

❖❖❖

सुनील चिंचोलकर
अजिंक्यनगर, हिंगणे खुर्द, पुणे ४११ ०५१.

# 'वर्तायाचा विवेक...!'

रवींद्र भट



समर्थ रामदासांच्या जन्म चतु:शताब्दीनिमित्त प्रकाशित होणाऱ्या या विशेष स्मरणात समग्र समर्थ चरित्रातील प्रसंग अभ्यासकासमोर मांडण्याचा उद्देश नसून वयाच्या आठव्या वर्षापासून "चिंता करितो विश्वाची" अशी आगळी धारणा असलेल्या योग्याच्या लेखणीतून सातत्याने समाजप्रबोधनासाठी व्यक्त झालेली एक अभिनव आणि त्याकाळाची आत्यंतिक महत्त्वाची गरज अगदी थोडक्यात सांगण्याचा हा अल्पस्वल्प प्रयत्न आहे.

समर्थ रामदास आणि छत्रपती शिवराय हे ज्या काळात अवतरले, त्या काळाची, या दोघांचे अवतरण होणे, ही महाराष्ट्राच्या मातीचीच गरज होती. परस्परांची कधी गाठ पडली होती का ? शिवरायांनी समर्थांचे शिष्यत्व पत्करले होते का ? या धुराळ्यामध्ये पडण्याची वास्तविक आज काडीचीही गरज नाही. त्या काळात समर्थांनी आदर्श पुरुषाची आणि आदर्श लोकनेत्याविषयीची जी चिंतने आपल्या अनेक निरूपणातून आणि लिखाणातून व्यक्त केली आहेत, त्याचा एकमेव अर्थ समर्थांनी एक अभिनव विचार दिला. शिवचरित्रातील अनेक प्रसंगांतून शिवरायांनी आदर्श पुरुषार्थाचा आणि आदर्श लोकनेतृत्वाचा आचार केलेला कोणाही अभ्यासकाला जाणवतो. सर्वार्थाने विचार केला तर या विशिष्ट कालखंडात विचार आणि आचार एक झाले; आणि महाराष्ट्राला शिवरायांच्या प्रमाणे आदर्श छत्रपती लाभला. आणि मुख्य म्हणजे तो स्वकीय राजा होता !

अवघ्या मानवी मनाचा आरसा असलेला, भक्तिमार्गाचा सोपान असलेला, वेदान्ताचे सखोल निरूपण असलेला आणि अनेक देवदेवतांची वर्णने असलेल्या पूर्ण पुरुष प्रभू रामाचा सतत उदेकार करणारा, 'दासबोध' हा ग्रंथ समर्थ रामदासांनी काळ नदीच्या खोऱ्यातील, वाघजाईच्या निबिड अरण्यातील एका गुहेत बसून कल्याणाला सांगितला अशी सर्वसामान्य समर्थ भक्तांची श्रद्धा आहे. परंतु समग्र समर्थ साहित्याचा जर विचार केला तर वयाच्या १६व्या वर्षापासून आपल्या अखंड भ्रमंतीत समर्थ रामदासांनी जे जे सुविचार, व्यक्त केले; त्या सर्वांचेच विषयानुरूप वर्गीकरण करून महाराष्ट्रात परत आल्यानंतर शिवथर घळीच्या वास्तव्यात राजकारण नीती, राजकारणी पुरुष, राजधर्म, क्षात्रधर्म, सावधता-प्रकरण, धूर्तपणाचे राजकारण इत्यादि राजनीतीशी संबंधित समास, तसेच काही श्लोकबद्ध विविध प्रकरणे, लिहून हा ग्रंथ समर्थांनी सर्वस्पर्शी केला आहे.

महाराष्ट्राच्या स्वराज्यनिर्मितीच्या, शिवरायांच्या जवळ जवळ यशस्वी झालेल्या स्वप्नावर मुघल सत्तेचे झंझावाती वादळ आले. सर्वत्र वैचारिक काळोख दाटला. महाराजांना आपले अनेक गड-कोट मुघलांच्या स्वाधीन करून नामुष्कीचा तह पत्करून मिर्झाराजे जयसिंहासह आग्र्याला जावे लागले. महाराष्ट्रातील मातीचा कणन्‌कण अस्वस्थ झाला. राजे सुखरूप परत यावेत यासाठी गावोगावी अनुष्ठाने सुरू झाली. कित्येक नवस बोलले गेले. साऱ्या रयतेच्या चेहऱ्यावर काळजीचे सावट आले.

समर्थ रामदासांचे मनही शिवथर घळीच्या विवरात रमेना. या प्रांती राहणे आता काही काळ शक्य नाही. ग्रंथरचनाही हातून पूर्ण होत नाही. तेव्हा येथील गबाळे आवरून आता दाक्षिण प्रांती जावे, रामेश्वराची यात्रा करावी, मार्गात तंजावरला व्यंकोजी राजांची भेट घ्यावी असा विचार करून समर्थांचा दक्षिण-संचार सुरू झाला. कराड, विटा, तासगाव, सांगली, वाडी या मार्गाने ते मिरजेला आले. मिरजेपासून कर्नाटक प्रांतात कागवाडला त्यांनी काही सज्जनांना अनुग्रह दिला. जो भेटेल त्याला समर्थांचे एकच सांगणे होते–

*''राघवाची भक्ति, ज्ञानाचे मंडण ।*
*भक्ताचे भूषण, राम येक ॥*
*नल्गे पिंड ज्ञान, नल्गे तत्वज्ञान ।*
*राघवाचे ध्यान, आठविता ॥*
*शब्दज्ञान पोथी, वाचिता प्रबळे ।*
*मागुते मावळे, क्षण येका ॥*
*रामी रामदासी, राघवाचि भक्ती ।*
*तेथे चारी मुक्ती, वोळंगिती ॥''*

कागवाडहून समर्थ चिकोडीला आले. चिकोडीला तिमाजीपंत देशपांडे यांनी समर्थांचा अनुग्रह घेतला. हा संसार असार आहे, त्यात अडकून राहाण्यापेक्षा समर्थ चरणी राहून साऱ्याच संसार व्यथेतून मुक्त व्हावे असे त्यांना तीव्रतेने वाटू लागले. त्यांची समजूत काढून समर्थ म्हणाले की, सारेच प्रापंचिक असे प्रपंच सोडून बाहेर पडले तर सारा जगव्यवहारच मोडकळीस येईल. प्रापंचिकांवर अनेक घटकांची जबाबदारी येईल. त्यांच्यावर सर्वस्वी अवलंबून असणारी पत्नी, नाकळत्या वयातील मुले, वृद्ध आई-बाप, यांच्याप्रमाणे सारे बारा बलुतेदारही प्रापंचिकावर अवलंबून असतात. त्यांचाही योगक्षेम प्रापंचिकाला पाहावा लागतो. प्रपंच त्यागून परमार्थ केला तर कदाचित आत्मोद्धार होईल, जीवोद्धार करायचा असेल तर आपली नित्यकर्मे पार पाडून इतर जीवांचा विचार करावा लागतो. प्रापंचिकाला उपासनेने मुक्ती मिळू शकते. त्यासाठी प्रपंचात राहूनही वैराग्यशील वृत्ती मनी जोपासता येते, सज्जन संगती ठेवून निःसंगही होता येते. आधी नेटका प्रपंच करावा, परमार्थ वानप्रस्थाश्रमात करता येईल.

*''आधी प्रपंच करावा नेटका*
*मग साधावे परमार्थ विवेका.''*

मजल दरमजल करीत समर्थ रामदास तंजावर प्रांती आले. व्यंकोजी राजांच्या भेटीत समर्थांनी अचूक जाणले की, महाराष्ट्राच्या राजकारणाविषयी व्यंकोजी राजांना फारसा रस नाही. स्वतःची वडिलोपार्जित जहागिरी सांभाळण्यात ते मश्गुल आहेत. त्यांची सारी कारभारपद्धती ही त्यांच्या सेवकांच्या हाती आहे. व्यंकोजींच्या भेटीत समर्थांनी निरूपणात यावर स्पष्टपणे सांगितले आहे.

*''सेवकजनावरी विश्वासला ।*
*तो सेवकी जेर केला ॥*
*समर्थ पराधीन झाला ।*
*हे ही अपूर्व ॥*
*कामा कारणे ठेविले ।*
*काम पाहूनी वाढविले ।*
*तेहि उगीच गर्वे फुगीले ।*
*कोण्या हिशोबे ॥*
*या कारणे बदलीत जाणे ।*
*सेवक आज्ञेच्या गुणे ।*
*तरीच समर्थपण जाणे ।*
*समर्थासी ॥*
*काम नासले तरी नासावे ।*
*परी सेवकाधीन न व्हावे*
*दास म्हणे स्वभावे ।*
*बोलिलो न्याय ॥''*

यथाकाली समर्थ मदुरेला आले. मीनाक्षीचे दर्शन झाल्यावर त्यांच्या मनी आदिमाया प्रकटली. मीनाक्षीचे स्वरूपात त्यांना तुळजाभवानी दिसू लागली. मनाचा सारा संभ्रम मिटला. आदिमातेपुढे नम्र होऊन समर्थ मुक्त स्वरात म्हणाले,

*''विश्वाची साक्षिणी माता । विश्वमाता म्हणोनिया ।*
*श्रीमंत करंटे तीने रक्षिले । पाळिले किती ॥*
*तिचा लो लागला आहे । त्रैलोक्य सकळे जना ।*
*ती विण विषयो कैसा । जगज्योती चहुकडे ॥''*

आदिमायेचा 'लो' म्हणजे छंद लागल्यावर चहूकडे प्रकाशच प्रकाश दिसणार, त्या आत्मप्रकाशाने समर्थांच्या मनातील सारा अंधार दूर झाला. अत्यंत आनंदी मनःस्थितीत समर्थ मंदिरातील गोपुराच्या बाहेर आले,

मुख्य वाराशी समर्थांचा सर्वत्र संचार करणारा, शिष्य चक्रपाणी त्यांची आतुरतेने वाट पहात होता. समर्थांना चक्रपाणीने एक शुभ वार्ता सांगितली. ''हर एक हुन्नर लढवून राजे औरंगजेबाच्या नजरकैदेतून निसटले. युवराजासमवेत ते मथुरेला हरिकृष्णाकडे छपून आहेत. काही काळ युवराजांना मथुरेला ठेवून सडे राजे हरिकृष्णासह आंतर्वेदीतील हरिचंद्राच्या मठाकडे कूच करणार आहेत !'' ही बातमी ऐकताच समर्थांचे मनातील सारेच मळभ नाहीसे झाले. शिवरायांच्या चातुर्याचे आणि निःस्पृहपणाचे त्यांना कौतुक वाटले. रामेश्वराच्या दिशेने अतिशय समाधानात त्यांनी मंडपम्‌ची वाट धरली.

अर्ध्या कोसाचा खवळलेला सागर नावेतून पार करून ते रामेश्वर बेटाच्या वालुकामय- किनाऱ्यावर उतरले. प्रभु रामचंद्रांनी स्थापन केलेल्या रामेश्वराच्या शाळुंकेची त्यांनी मनोभावे पूजा केली. धनुष्कोडीला सेतूचे अवशेष पाहिल्यावर त्यांची प्रतिभा जागृत झाली. नुसत्या रामनामाने या खवळलेल्या सागरावर हे पाषाण तरले. माणूस तर नक्कीच तरून जाईल. फक्त त्या रामशक्तीवर श्रद्धा हवी ! श्रद्धेने रामचरित्राप्रमाणे आचार आणि श्रद्धेनेच समाजातील पाषाणवत्‌ माणसे तरून न्यायला हवीत. मुळात श्रद्धा ही अतिशय महत्त्वाची तिच्याशिवाय केलेली कोणतीही खटपट हा मोठा शीण आहे. हे ज्ञानेश्वर माऊलीनेही सांगून ठेवले आहे. मध्यंतरीच्या काळात माऊलीच्या या वचनाचा जनलोकांना विसर पडला.

*''न सोडोनी श्रद्धेची बाहे । दुराग्रहाची त्राये ।*
*वाढवू नये ॥''*

पण ऐहिकात अडकलेले जनमानस दुराग्रहाचीच कास धरू लागले. हाती काही सापडले नाही; तेव्हा दुसऱ्याच्या धनावर डोळा ठेवू लागले. यामधून निर्माण झाले अनाचार, आसक्ती, अभिमान आणि संती अनास्था ! या साऱ्यांची कटू फळे देश अजून भोगत आहे.

शिवरायांच्या सुटकेची वार्ता कळली. रामेश्वरयात्रा सुफल झाली, तेथील वाळू झोळीत घेऊन समर्थ निघाले; आणि मजल दरमजल करीत गोकर्ण महाबळेश्वराचे दर्शन घेऊन त्यांनी नावेतून 'सदाशिव' गडाची खाडी ओलांडली. गोमंत प्रांती प्रवेश केल्यावर त्या प्रदेशात चाललेल्या फिरंग्यांच्या कारवायांच्या वार्ता समर्थांच्या कानावर पडू लागल्या. साऱ्या किनारपट्टीतच हाती तराजू घेऊन आलेल्या या फिरंग्यांनी इथल्या अडाणी कोळी जनांना फितवून आपल्या धर्मात ओढून हातपाय पसरण्यास सुरूवात केली होती. या किनाऱ्याचे वेळीच संरक्षण झाले नाही तर हे फिरंगी हा साराच निसर्गरम्य भाग आपल्या घशात घालतील. त्यांची टोलेजंग देवळे आत्ताच या प्रदेशात ठाई ठाई दिसत आहेत. या फिरंग्यांचे आपल्या संस्कृतीवर आलेले आक्रमण थोपवण्यासाठी येथे आपल्या संप्रदायाचा प्रसार जास्त प्रमाणात व्हायला हवा. त्यांना याची तीव्रतेने जाणीव झाली. आपल्या गोविंद नावाच्या शिष्याला संप्रदायाचा प्रसार करण्यासाठी मठ स्थापना करण्याचा आदेश दिला. हे कार्य या मठाकडे सोपविताना समर्थांनी गोविंदाला सांगितले, ''या प्रांतीच्या लोकांच्या अज्ञानाचा आणि दारिद्र्याचा फायदा हे फिरंगी लोक खोटी आमिषे दाखवून, कधी शक्तीचा उपयोग करून घेत आहेत. आपल्या संप्रदायाला हे मान्य नाही. तरीही माघार न घेता हे लोक ज्या पद्धतीचा वापर करतात, त्याच पद्धतीने आपल्या धर्माचे रक्षण करायला हवे. मात्र ही कृती अतिशय सावधपणे करायला हवी. या संदर्भात समर्थांनी तिथल्या तिथे एक अष्टक लिहून गोविंदाच्या हाती दिले.

*काका काक बरा, बका बक बरा, ठोक्याशी ठोका बरा।*
*श्वानाश्वान बरा, स्वरा स्वर बरा, हिंस्यासी हिंसा बरा ॥*
*सिंहा सिंह बरा, गजा गज बरा, राजासी राजा बरा ।*
*शीधा शीध बरा, बुधा बुध बरा, सद्‌गुण संता बरा ॥*
*श्रेष्ठा श्रेष्ठ बरा, शुभा शुभ बरा, योग्यासी योगी बरा ।*
*शुद्धा शुद्ध बरा, सीला शील बरा, तैशासी तैसा बरा ॥'*

गोमंतकातील मठ, गोविंद गोसाव्याच्या हाती सोपवून समर्थ निघाले. मार्गातील बरेच मुक्काम टाकून, बेळगाव निपाणीवरून ते करवीराला आले. महालक्ष्मीचा आशिर्वाद घेऊन वाठार-कराड मार्गे समर्थ कृष्णातीर ओलांडून चाफळ मुक्कामी आले. काही काळ चाफळ मठात मुक्काम करून आपले दासबोध निरूपणाचे कार्य पूर्ण करण्यासाठी समर्थ कल्याणासह शिवथर घळीत परतले; शिवथर घळीत असताना दिवाकर गोसावी यांनी समर्थांची गाठ पडल्यावर, शिवबा राजे राजगडावरील मुक्काम हलवून कोकण प्रांती रायगडावर नवी राजधानी स्थापन करण्याच्या विचारात आहेत ही वार्ता सांगितली.





अनुक्रमणिका

हा दुर्ग मोठा कठीण आहे, म्लेच्छांस रिघावयास वाव नाही. समर्थ रामदासांच्या मनातील विचार आणि शिवरायांचा आचार एकच आहे याचे त्यांना प्रत्यंत आले. ते दिवाकराला म्हणाले, राजे आंतरनिष्ठ आहेत. दक्षिण यात्रेच्या परतीवर आम्ही गोमंत भूमीवर चाललेले फिरंग्याचे आक्रमण पाहिले आहे. गोमंत भूमीप्रमाणेच आपल्या साऱ्याच किनारपट्टीला फिरंगणातून आलेल्या या लाल तोंडी सापांचा धोका आहे. राजे राजधानी करून कोकण प्रांती राहिले तर या फिरंग्याच्या ट्हालचालींवरही करडी नजर ठेवता येईल. त्यांना फार आत येताच येणार नाही अशी व्यवस्था करता येईल. कोकण आणि देश दोन्हीकडेही या रायगडावरून राजांना लक्ष ठेवता येईल.

शिवरायांच्या सर्व हालचालींची लक्षणे ही पूर्वी आपणच सांगितलेल्या महंत लक्षणांशी साम्य असलेली आहेत. आदर्श लोकनेतृत्वाचे आणि चातुर्य लक्षणांचे शिवराय हे अतिशय सुंदर आणि समर्पक रूपक आहेत. पूर्वी उद्धवासाठी महंत कसा असावा याचा उपदेश समर्थांनी केला होता. त्याचेच त्यांना पुन्हा स्मरण झाले.

*''वर्तायाचा विवेक । राजी राखणे सकळ लोक ।*
*हळूहळू पुण्यश्लोक । करीत जाणे ॥*
*मुलाच्यां चालीने चालावे । मुलांच्या मनोगते बोलावे।*
*तैसे जनासी सिकवावे । हळुहळु ॥*
*मुख्य मनोगत राखणे । हेचि चातुर्याची लक्षणे ।*
*चतुर तो चतुरंग जाणे । इतर वेडी ॥*
*वेड्यासी वेडे म्हणो नये । वर्म कदापि बोलो नये ।*
*तरीच घडे दिग्विजये । निःस्पृहासि ॥*
*उदंड स्थळी, उदंड प्रसंग। जाणोनि करणे यथा सांग।*
*प्राणिमात्रांचा अंतरंग । होवोनि जावे ॥*
*मनोगत राखोन जाता । परस्परे होय अवस्था ।*
*मनोगत, तोडिता व्यवस्था । बरी नाही ॥*
*या कारणे मनोगत । राखेल तो मोठा महंत ।*
*मनोगत राखता समस्त । वोढोनी येती ॥*

❖❖❖

**रवींद्र भट**
एफ् २, सप्तशृंगी अपार्टमेंट, १५११ ब, सदाशिव पेठ,
पुणे ४११ ०३०. दूरभाष (०२०) २४४७४८७७

□

# समर्थ रामदासांचे समाजचिंतन

□

डॉ. भास्कर व्यं. गिरिधारी



श्री समर्थ रामदास स्वामी निर्विवाद एक पुरोगामी विचारांचे राष्ट्रीय संत होते. काळजीपूर्वक (त्यांच्या अपेक्षेप्रमाणे) आपण त्यांची आज उपलब्ध ग्रंथसंपदा पाहिली, अभ्यासली तरी त्यांची पुरतेपणी कल्पना येते. त्यांनी प्रपंच-विज्ञान सांगितले. प्रत्यक्षातील व्यवहारवाद समजावून सांगितला. त्यांचे समग्र तत्त्वज्ञानच एकंदरित भौतिक आणि ऐहिक समृद्धीचे आहे. अगदी आजच्या परिस्थितीत एकविसाव्या शतकातही मार्गदर्शक ठरणारे आहे. त्यांचे हे सर्वस्पर्शी व्यापक पुरोगामी आणि बुद्धिवादी तत्त्वज्ञान-विचारसरणी आपण मनात कोणतेही पूर्वग्रह न बाळगता समजून घेतली पाहिजे.

**'पहा माझे ग्रंथ नीट...'**

आपल्या ग्रंथांच्या, त्यात मांडलेल्या तत्त्वज्ञानाच्या आधारे माझे कार्य तुम्ही पुढे चालवावे. शोक करीत बसू नये. माणसाचे शरीर शेवटी नश्वरच आहे. हे स्वतः शोकमग्न आणि पोकळी निर्माण होणार याची जाणीव झालेल्या आपल्या समस्त शिष्य परिवाराला त्यांनी समक्षच समजावून सांगितले. ही घटना अनुकरणीय आणि आजही मार्गदर्शक आहे. ग्रंथांमध्ये जी वाङ्मयमूर्ती दिसते. तोच आधार आणि त्यातील विचारसरणीच्या प्रकाशातच पुढील वाटचाल करावयाची असते. समर्थांनी सगळ्यांनाच सांगून ठेवले आहे...

*'माझी काया आणि वाणी ।*
*गेली म्हणाल अंतःकर्णी ॥*
*परि मी आहे जगज्जीवनी ।*
*निरंतर ॥*
*आत्माराम दासबोध ।*
*माझे स्वरूप स्वतःसिद्ध ॥*
*असता ना करावा खेद ।*
*भक्तजनी ॥*
*नका करू खटपट ।*
*पहा माझे ग्रंथ नीट ॥*
*येणे सायुज्याची वाट ।*
*भेटी जीवा ॥*(किंवा गवसेल की ॥)'

आपल्या पश्चात अनुयायांनी, शिष्यांनी कार्य करावे हे द्रष्ट्या महापुरूषाने सुस्पष्ट शब्दात मांडले आहे. सज्जनगडावरील समाधीचे दर्शन घेऊन दुःख व्यक्त करून भागणार नाही, तर समर्थांचे कार्य निष्ठेने पुढे चालविणे महत्त्वाचे आहे, हा संदेश यातून मिळतो.

**भारत भ्रमण आणि लोक-अभ्यास**

समर्थ रामदासांनी आपले विचार स्वानुभवातून मांडले आहेत म्हणून समर्थांच्या शब्दा-शब्दाला वजन प्राप्त झाले आहे. कोरडे ज्ञान किंवा पोपटपंची, निरर्थक बडबड कोठेही नाही. उलट 'हे तो प्रचीतीचे बोल' हाच प्रत्यय त्यांचा वाङ्मयातून येतो.

केवळ तीर्थाटन, पर्यटनाच्या आजच्या काळातील हे भारतभ्रमण नव्हते तर हा सारा प्रवास, ज्या परिस्थितीची चाहूल त्यांना बालपणीच लागली होती तिचे अवलोकन, निरीक्षण करण्यासाठी होता. भारत देशाचा अनुभव घेऊन मार्ग काढायचा होता. लोकांचे राहणीमान आणि जीवनमान पारखायचे होते. लोकांत मिसळायचे होते. तिशीतील नवयुवक कर्तबगार महंत नेमायचे होते.





अनुक्रमणिका

मठासाठी जागा मिळवायच्या होत्या. जनलोकांशी संवाद साधायचा होता. वस्तुतः कोणतेही प्रसिद्धी माध्यम वा आज ज्याला आपण 'मास मिडिया' म्हणतो, ते काहीही उपलब्ध नव्हते. तरी समर्थांनी आपल्या ज्ञानोपासना, बलोपासना आणि कलोपासनेच्या बळावर समाजात स्थान संपादन केले.

समर्थांच्या या भ्रमंतीमध्ये काशी, गया, प्रयाग ह्या त्रिस्थळी यात्रेबरोबरच पंजाब, काश्मीर, अयोध्या, श्रीनगर, बद्रीनाथ, केदारनाथ, मानस सरोवर, या प्रदक्षिणेसह जगन्नाथपुरी सेतुबंध, रामेश्वर, श्री शैलम्, शेषाचल, गोकर्ण महाबळेश्वर, करवीर, कोकण, पैठण ही स्थाने होती. राजकीय-सामाजिक जीवनाचे अवलोकन सूक्ष्म निरीक्षण या प्रवासातून त्यांना करता आले.

समर्थांनी आपल्या लोकसंघटनांसाठी १४०० महंत निवडले आणि ११०० मठांची स्थापना 'जागृतीची केंद्रे' म्हणून केली. बलोपासनेसाठी ११ मारूती बरोबरच 'गाव तेथे मारूती' ही कल्पना रूजविली. यातही आत्मविश्वास आणि स्वतःचे सामर्थ्य वाढविण्याची क्लृप्ती होती. *'शक्तीने पावती सुखे । शक्ती नसता विटंबना ॥'*.

हे समर्थांनी जाणले होते. त्यांनी सुरू केलेले रामनवमी, हनुमानजयंती-उत्सव लोकसंघटनेसाठीच होते. पुढे लोकमान्य टिळकांनी 'शिवजयंती' किंवा 'गणेशोत्सव' अशाच सद्हेतुने सुरू केले होते. अशा उत्सवात मुळात हे जनजागरणाचे सामर्थ्य असते. 'सामर्थ्य आहे चळवळीचे...' हेच खरे !

**गर्दी नव्हे; 'समुदाय' निर्मिती**

स्वतंत्रराज्यनिर्मितीची मनोभूमी तयार व्हावी यासाठी श्री समर्थ रामदासांना 'गर्दी' अभिप्रेत नव्हती, तर त्यांना 'समुदाय' करावयाचा होता. समुदायाची त्यांची व्याख्याच अशी होती की एकाच मार्गदर्शकाच्या विचाराने, एकाच समान उद्दिष्टांनी, एका विशिष्ट वेळी लोक जेव्हा एकत्र येतात, त्याला ते समुदाय म्हणतात.

समुदाय डाळिंबातील उकलल्यानंतर दिसणाऱ्या शिस्तबद्ध रांगेतील, ओळीतील, दाण्यांसारखा असतो; तो भर बाजारातील पोत्यातून उभारलेल्या बटाट्याच्या ढिगासारखा नसतो. असा समुदाय त्यांनी मिळविला त्यांचे हे प्रयत्न पुढील वचनांतून स्पष्ट होतात.

*'या कारणे समुदाय । झाला पाहिजे महोत्सव ॥'*
*हातो पाती देवाधिदेव । बोले सो करावा ॥*
*देव मस्तकी धरावा । अवघा हल्कल्लोळ करावा ।*
*मुलुख बुडवा का, बडवावा । धर्म संस्थापनेसाठी ॥*
*'बहुत लोक मेळवावे । एक विचारे भरावे ।*

हा समर्थांचा मुख्य हेतू होता. तेवढ्यासाठी ते 'महाराष्ट्र धर्म वाढवावा' म्हणून जनसंवाद साधतात. ते म्हणतात.

*'दोष देखौनि झाकावे । अवगुण अखंड न बोलावे*
*दुर्जन सापडोनि सोडावे । परोपकार करूनी ॥*

यातूनच त्यांना लोकसंघटक कार्यकर्ते म्हणून महंत लाभले आणि 'मराठा तितुका मेळवावा' या कार्याचे केंद्र 'मठ' वसविले. ते म्हणतात—

*'महंते महंत करावे ।*
*युक्ति करूनी भरावे ।*
*जाणते करूनी विखरावे ।*
*नाना देशी ॥'*

कार्याच्या विस्ताराची त्यांची ही कल्पना होती. भान ठेवून त्यांनी अत्यंत कठीण काळात ही योजना आखली. आणि त्यांनीच म्हटल्याप्रमाणे 'क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे.' अशा कल्पनेने, विचारसूत्राने त्यांनी यशस्वीपणे कार्यान्वित करून दाखविली.

'अस्मानी आणि सुलतानी' आणि 'परचक्र निरूपण' यात वर्णन केलेल्या समाजाच्या दुःस्थितीत समाजाच्या मनाची मनापासून मशागत केली. कारण 'उदंड' दुःख लोकांचे पाहून, ऐकून त्यांचे उर फाटले होते. स्वतंत्र मराठी राज्यस्थापनेला जनमत अनुकूल करून त्यांनी आपला पूरक सहयोग दिला.

**विवेकी समुदाय**

समर्थ रामदासांनी महाराष्ट्र संस्कृतीला विवेकाचे अधिष्ठान प्राप्त करून दिले. 'विवेक' 'विचार' हा शब्द शेकडो वेळा या ना त्या अर्थाने सतत समर्थ रामदासांच्या वाङ्मयात आलेला आहे. कोणतीही गोष्ट विचारपूर्वक करावी असे त्यांचे म्हणणे होते. त्यासाठी त्यांनी पानावरील आळीचा दृष्टांत दिलेला आहे. साधी पानावरची आळी पुढे सरकताना डावी, उजवीकडे चाचपून पाहते आणि मग पुढे सरकते. आपण तर माणसे



अनुक्रमणिका

आहोत, विचारपूर्वक पाऊले टाकली पाहिजेत असे ते ठिकठिकाणी नमूद करतात. समर्थ-कार्य लक्षात घेता महाराष्ट्र संस्कृतीला बौद्धिक सामर्थ्य त्यांनी प्राप्त करून दिले आहे, हे त्यांच्या समग्र वाङ्मयातून— दासबोध, मनाचे श्लोक, अभंग गाथा, आत्माराम, स्फुट लेखनातून स्पष्टपणे लक्षात येते. लोकभ्रम, अपसमज, अनिष्ठ रूढी, त्यांचा धिक्कार स्पष्ट शब्दात समर्थांनी केलेला आहे. त्याची दखल घेणे आवश्यक आहे.

समर्थ रामदासांनी आपल्या वाङ्मयातून लोक-अपसमजावर उघडपणे प्रहार केले आहेत.

*देवे निर्मिली ही क्षिती ।*
*तिचे पोटी पाषाण होती ।*
*तयासची देव म्हणती ।*
*विवेक हीन ॥* (द. ८-स. १ ओ. २९)

*'धातू पाषाण मूर्तिका ।*
*चित्रलेप काळ देखा ।*
*तेथे देव कैचा मूर्खा ।*
*भ्रांति पडली ॥* (द. ८ स. १ ओ. ४४)

*म्हणौनि जितुका भोळाभाव ।*
*तितुका अज्ञानाचा स्वभाव ।*
*अज्ञाने तरी देवाधि देव ।*
*पापिजेल कैसा ॥* (द. ७ स. १ ओ. ७७)

भोळ्या भावाचे हे असे समर्थांचे परखड उद्‌गार आहेत. म्हणून पुढे ते म्हणतात—

*भोळा भाव सिद्धीजाय ।*
*हा उधाराचा उपाय ।*
*रोकडा मोक्षाचा अभिप्राय ।*
*विवेके जाणावा ।* (द. १५ स. १ ओ. ४०)

आपापल्या कर्मानुसार प्राणी नष्ट किंवा भला ठरतो. समर्थ म्हणतात, 'शत ज्ञात्याचे चमत्कार' यालाच भ्रम म्हणतात, 'मेले माणूस भोजना येते या नाव भ्रम ॥' (द. १० स. ८ ओ. २०)

'ब्रह्मा लिहितो अदृष्टी । वाचून जाते सटी ॥' या वचनांमधून अंधश्रद्धा, दुष्टाचार, नवससायास, उपवास, भूतबाधा, स्वप्नाळू भविष्यवाणी, प्रारब्ध यावर समर्थ रामदासांचा विश्वास नव्हता. सगुण भक्ती सुद्धा निर्गुण निराकाराकडे जाण्यासाठीच आहे; असे त्यांनी दासबोधात म्हटलेले आहे. 'भलत्या गोष्टींना समर्थ मानीत नाहीत. ते म्हणतात,

*'गुणेविण वडिलपण ।*
*हे तो अवघे अप्रमाण ॥'* (द. १५ स. ३ ओ. १७)

केवळ वयाने माणसाला मोठेपण प्राप्त होऊ नये. मोठेपण हे गुणांवर वेतले जावे; असा त्यांचा अभिप्राय आहे.

त्यांचा पुनर्जन्म कल्पनेलाही विरोध आहे. ते म्हणतात, 'आशा धरी मूर्खा, पुढिल्या जन्माची ।' ती आशा व्यर्थ आहे. कारण—

*'पुढे जन्मांतरी होणार ।*
*हा तो अवघाची उधार ।*
*आता मी जे देईन ।*
*ते पुढले जन्मी पावेन ।*
*ऐसे कल्पि तो अज्ञान ।*
*बद्ध जाणावा ॥* (द. ८ स. ७, ओ. १७)

अशी ही समर्थवाणी पुरोगामी विचारांची पुरस्कर्ती आहे.

**लोकशिक्षण-प्रपंच, परमार्थ, विवेकाचे**

समर्थ रामदासांनी आपली संपूर्ण हयात लोकशिक्षणासाठी 'भारतीयत्व' जपण्यासाठी वेचली. ज्या काळात 'साक्षरता' प्रसाराचे नावही नव्हते. त्या काळात त्यांनी लिहिण्या-वाचण्याची, श्रवणाची मोहिम उघडली. 'दिसा माजी काही तरी ते लिहावे' 'प्रसंगी अखंडित वाचीत जावे' असे समर्थांनी म्हटले आहे. त्यांचे प्रसिद्ध वचन आहे—

*जे जे आपणासि ठावे ।*
*ते ते इतरांसि शिकवावे ।*
*शहाणे करून सोडावे ।*
*सकळ जना ।*

समर्थ रामदासांनी प्रपंच आणि परमार्थ याची अत्युत्कृष्ठ सांगड घातलेली आहे. त्यांचे प्रपंच विज्ञान आजही संसारी गृहस्थी जीवन जगणाऱ्यांना उपयुक्त ठरावे असेच आहे. 'प्रपंची पाहिजे सुवर्ण' हे त्याकाळीच ४०० वर्षांपूर्वी त्यांनी सांगितले आहे. आपले प्रपंच विज्ञान-व्यवहार सांगताना समर्थ पहिला दंडक सांगतात—

*काही मेळवी मग जेवी । गुंतल्या लोकास उगवी ।*
*शरीर कारणी लावी । काही तरी ॥*

आधी नीटनेटकेपणाने संसार करावा मग परमार्थ विवेक करता येईल. प्रपंच सोडून जर परमार्थ केला तर दुःखी होण्याची वेळ तुमच्यावर येईल. प्रपंच सोडून परमार्थ केला तर अन्नसुद्धा खायला मिळणार नाही.

*प्रपंची जे सावधान ।*
*तोचि परमार्थ करील जाण ।*
*प्रपंची जो अप्रमाण ।*
*तो परमार्थी खोटा ॥*

म्हणून अखंड सावध राहून प्रपंच परमार्थ करणे योग्य. असे केले नाही तर नाना प्रकारचे दुःख भोगावे लागले असते.

प्रयत्नवाद, प्रबोध, प्रचिती, जागृती ही त्यांच्या दृष्टीने महत्त्वाची मूल्ये होती. या तत्त्व जोपासण्यात समर्थ रामदासांचा पुरोगामी दृष्टिकोण सर्वत्र स्पष्ट झाला आहे.

'भीक्षा मिसे जन पारखावे' साधी भिक्षा मागायला गेलात तरी लोकांची परीक्षा करीत जा अशी समर्थांची शिष्यांना शिकवणूक होती. यावरून नव्या विचारांना बुद्धिवादी पुरोगामी विवेकनिष्ठेला समर्थ रामदासांनी आपल्या एकंदर चिंतनात केवढे बारकाईने काळजीपूर्वक महत्त्व दिले होते हे पटते.

❖❖❖

**डॉ. भास्कर व्यंकटराव गिरिधारी**
'विभा' प्लॉट नं. १५, पर्णश्री को.ऑप. हौ. सोसायटी,
एच्.पी.टी. कॉलेज रोड, नाशिक - ४२२ ००५.
भ्रमण व दूरभाष : ९८२३०१२३०१,०२५३ ६५२३४०१

---

## स्वागत

अब्वांची बब्बड... : सुभाष कंटक - स्वतः (बाल) (४६)
हिरा ठेवता ऐरणी : प्रकाश पाठक - देशमुख आणि कं., पुणे (४८८)
संत साहित्य आणि आजची पिढी : मिलिंद जोशी - संस्कृति प्र. पुणे (१२८)
अरे माणसा-माणसा ! : आदर्श ऋषि - ओम् प्रकाशन, अहमदनगर, (१२०)
दूरदर्शी (चरित्र) : माणिक कोतवाल - राजहंस, पुणे. (२४८)
अल्पसंख्या (कादं.) : विजय पाडळकर - राजहंस, पुणे (९०)
अरुणाचल प्रदेश (प्र.) : शशिधर भावे, राजहंस, पुणे (२४०)
माझा प्रवास (प्र.) : संपा.-मृणालिनी शहा, राजहंस, पुणे (१८४)
बातचीत : (नाट्य) महेश एल्कुंचवार - राजहंस, पुणे (१८४)
चंद्रलोक : मोहन आपटे - राजहंस, पुणे (१४२)
प्रेरणादायी सुविचार : अनु. चंद्रकांत पाटील - साकेत, औरंगाबाद (१०४)
संस्कारकथांतून मुलांचा विकास : शंकर कन्हाड - साकेत, औरंगाबाद (७२)
गब्बरसिंग पैलवान आणि धम्माल गोष्टी : दिनकर बोटीक - साकेत, औरंगाबाद (५२)
सादाको आणि बगल : (अनु.) बाबा भांड - साकेत, औरंगाबाद (४०)
नो एन्ट्री, फारच टेस्टी : वसुंधरा वुइनगोल - मधुराज, औरंगाबाद (४४)
साकारलेले स्वप्न : उषा चौसाळकर, स्वतः (१३९)
मामाची रंभा : (कविता) गणेश साखरे, सोनल प्र., अमरावती (८८)
माझी शासनसेवा : शाम शिंदे, शिवम्, पुणे (१६८)
देवाची माणसं : सोपान खुटवड - देशमुख आणि कं. पुणे (१५६)
मंतरलेला इतिहास : हर्षद सरपोतदार - देशमुख आणि कं., पुणे (२१२)
संप्रधार : (काव्य) रमण रणदिवे, सोमनाथ, मुंबई (६४)
देहबोली : अनु. सुधीर सेवेकर, साकेत, औरंगाबाद (१२०)
सावरिया : राधिका टिपर, साकेत, औरंगाबाद (२२४)
मुलाखत : गिरीधर पांडे, साकेत, औरंगाबाद (७१)
वॉल्ट डिस्ने : (वै.) यशवंत रांजणकर, राजहंस, पुणे (३३२)
पारध : (कथा) अशोक जैन, राजहंस, पुणे (१९६)
अशी ही इंग्रजी : एन्.डी.आपटे, राजहंस, पुणे (१९६)
आर्यांच्या शोधात : मधुकर ढवळीकर, राजहंस, पुणे (१३०)
आपले मराठी अलंकार : म. वि. सोवनी, राजहंस, पुणे (१३२)
पंचामृत : ना. वा. कुलकर्णी, स्वतः (५८)
वाटा ज्ञात-अज्ञात : वामनराव वाडेकर - शिवम्, पुणे (१०८)
इस्लाम आणि पै. मुहम्मद : उसूल, पुणे (१८८)
विदेशी बुजगावणं : (कथा) रमेश सोनार - मधुश्री, पुणे (१६६)
रंग यादोके : (वै.) प्रभाकर तांबट - मधुश्री, पुणे (१४४)
आदर्श संस्कारमाला : (वै.) मोहन पुराणिक - मधुश्री, पुणे (१९८)
कथुक्या : (कथा) - शिरीष बलवड - मधुश्री, पुणे (१२८)
प्रजापालक : श्रीमंत राजयोगी - महादेव सगम - मधुश्री, पुणे (११२)
इच्छा असल्यास वाचा : रघुनाथ लोणकर - मधुश्री, पुणे (८०)
मुशाफिरी : (काव्य) रामचंद्र गलांडे - मधुश्री, पुणे (९६)
स्वप्नराणी होऊन रहा : निर्मला कुलकर्णी - मधुश्री, पुणे (१६०)
शोध सुखाचा : (कथा) - नामदेव शेटे - मधुश्री, पुणे (११२)
रंग : (वै.) दीपश्री धामणकर - मधुश्री, पुणे (१८०)
कुंडली : (कथा) - लता माने - प्रियांजली, पुणे (२०६)
सायबाची वैजंता : (कथा) किसन शेलार - प्रियांजली, पुणे (१६८)
विविधांगी शिक्षण : शंकर पेंढारकर - प्रियांजली, पुणे (१२८)
मेघवर्षा : (कथा) श्रीपाद भिडे - प्रियांजली, पुणे (१६८)

# समर्थांचे लोकसंज्ञापन



मधु नेने

आज जे काम वृत्तपत्रे वा माध्यमे करतात तशाच प्रकारचे काम विविध काळात, विविध प्रकारांनी केले गेले आहे. कीर्तन ही भारतीय परंपरेतील संकल्पना पत्रकारितेच्या खूप जवळ जाणारी आहे. कीर्तनाला ज्यांची गादी म्हणून संबोधण्यात येते ते देवर्षी नारद आद्य वार्ताहर म्हणून ओळखले जातात. पत्रकाराच्या घडामोडी ते देवांना जाऊन सांगत असत. पूर्वी कीर्तनकारही आपल्या कीर्तनात, 'परवा अमक्या-अमक्या ठिकाणी आम्ही कीर्तनाला गेलो होतो आणि महाराज...' असं म्हणत तिथं घडलेल्या घटना-प्रसंगांची वर्णनं श्रोत्यांपुढे ठेवीत. त्यांच्या सांगण्यात नाट्य असे, त्यामुळे तो प्रसंग आपल्या डोळ्यांपुढे उभा राहायचा. त्यांचे सांगणे ही आजच्या भाषेतील बातमी आणि त्यांचे हावभाव किंवा आविर्भाव म्हणजे छायाचित्रे. कीर्तनकारांप्रमाणेच अनेक लोककलाकारही या गावची बातमी त्या गावात त्यांच्या-त्यांच्या माध्यमाप्रमाणे सांगत असत. हेच काम संतांनीही केले. संत नामदेवांचे तीर्थावलीचे अभंग ही एक प्रकारची प्रवासवर्णनेच होत तर ज्ञानदेवांचे समाधी प्रकरण हा संत नामदेवांनी त्या घटनेचा साद्यंत वृत्तांतच कथन केला असे म्हणता येईल. संत एकनाथांनी भारूडाच्या माध्यमातून लोकशिक्षण केले तर त्यांनीच ज्ञानेश्वरीची प्रत 'शुद्ध' केली. याचाच आजच्या भाषेतला अर्थ त्यांनी या ग्रंथांचे संशोधन आणि संपादन केले. या सर्व गोष्टी आजच्या पत्रकारितेच्या व्यापक संकल्पनेत बसणाऱ्याच आहेत. समर्थ रामदासांनी अशाक्य स्वरूपाचे कार्य अधिक व्यापक स्वरूपात केले; म्हणून तेही 'पत्रकार' या संकल्पनेत बसू शकतात; आणि त्यांचे कार्य ही पत्रकारिताच होती.

पत्रकारितेच्या आधुनिक संकल्पनेप्रमाणे पत्रकार हा लोकशिक्षक असतो, प्रबोधनकार असतो. समाजात जे काही बरेवाईट चालले आहे त्याची दखल पत्रकार घेतो, वार्तेच्या स्वरूपात ते समाजासमोर ठेवतो, अग्रलेख वा लेखांच्या माध्यमातून त्यासंबंधी अधिक माहिती देतो वा विश्लेषण करतो आणि त्यातून एक प्रकारे समाज प्रबोधनच करण्याची त्याची भूमिका असते. समर्थ रामदासांनी नेमके हेच केले. रामदासांनी बारा वर्षांच्या पुरश्चरणानंतरची बारा वर्षे अखंड देशाटन केले. देशाटनाच्या माध्यमातून समाजाची नेमकी स्थिती काय आहे याची ओळख होते आणि ती झाल्यावर त्यावरचे उपाय सुचतात. रामदासांनी अशा प्रकारच्या परिभ्रमणातून तत्कालीन परिस्थिती जाणून घेतली आणि त्यातूनच त्यांना परिस्थितीचे गांभीर्य लक्षात आले. ही सारी परिस्थिती त्यांनी आपल्या साहित्यकृतींमधून मांडली. पत्रकाराचे हेच काम असते. ज्येष्ठ पत्रकार माधवराव गडकरी म्हणत, पत्रकाराने कधीही एका जागी बसू नये, तो सारखा हिंडता-फिरता राहिला तरच त्याला समाजाचे प्रश्न समजतात आणि मांडता येतात. रामदास म्हणतात, 'ब्राह्मणु हिंडता बरा.' (इथे 'ब्राह्मण' शब्द जातीवाचक नाहीतर तो नेतृत्वाशी संबंधित आहे. शब्दांचे अर्थ कालसापेक्ष घ्यावयाचे असतात.) पत्रकार हेही समाजाचे नेतृत्व करीत असतात; त्यामुळे त्यांनी लोकांतात राहावे. रामदास स्वतः लोकांत मिसळत. त्यांची भिक्षेची संकल्पना ही प्रबोधनाशी, पत्रकारितेशी संबंधित आहे. भिक्षेच्या निमित्ताने ठिकठिकाणची घरे पाहता येतात.

त्यातून परिस्थितीची जाणीव होते. वार्ताहर फिरला तरच त्याला बातमी समजते. भिक्षा मागणारे रामदासी एकप्रकारचे वार्ताहरच होते.

रामदासांच्याच चरित्रातली एक घटना सांगण्यात येते. रामदास पाटण-चाफळ परिसरात भिक्षा मागण्यासाठी जात. ते ज्या घरात नियमित जात अशा एका घरातली कर्ती स्त्री त्यांना खिन्न, उदास दिसली. दोन-तीन दिवस तिची ती अवस्था पाहून त्यांनी चौकशी केली असता त्यांना समजलेली घटना धक्कादायक होती. चार एक दिवसांपूर्वी कोणीतरी ठाणेदार तिच्या पतीला कोल्हापुरी घेऊन गेला, तो अजूनपर्यंत परत आला नव्हता. रामदासांना ही घटना समजल्यावर त्यांनी चौकशी केली, पाठपुरावा केला; आणि त्या इसमाला सोडवले. आजची शोधपत्रकारिता यापेक्षा वेगळी काय असू शकते ? पु. ल. देशपांडे म्हणत, ''मराठीत 'रिपोर्टर' ला 'वार्ताहर' म्हणतात ते शब्दशः खरे आहे. वार्ता अक्षरशः हरण करून आणावी लागते.'' रामदासांनी उपरोक्त घटनेत अशा प्रकारचेच काम करून पत्रकारितेतील एक गुणधर्म जोपासला.

भिक्षा मागण्याच्या निमित्ताने संपर्क प्रस्थापित करता येतो. त्या काळाला धरून त्यांनी हा मार्ग सुचविला आहे. पत्रकारांचा समाजातील सर्व घटकांशी नित्य संबंध असला तरच त्याला बातम्या समजतात. 'भिक्षा' एवढा शब्द सोडला तर आजही पत्रकाराने कसे वागावे याचे दिशादर्शन रामदास करतात. ते म्हणतात, भिक्षेच्या निमित्ताने गावातील, नगरांतील घराघरात जावे, घरातल्या लहान-मोठ्यांची परीक्षा करावी; म्हणजेच पारख करावी, त्यासाठी मैत्री वाढवावी. बातमीदारांना एक चांगला कानमंत्र देताना समर्थ लिहितात,

*सावधपणे सर्व जाणावे ।*
*वर्तमान आधीच घ्यावे ।*
*जाऊ ये तिकडे जावे ।*
*विवेके सहिता ।*

सगळ्या गोष्टी सावधपणे जाणून घ्याव्यात, बातमी आधीच मिळवून ठेवलेली असावी आणि सर्वांत महत्त्वाचे म्हणजे जिथे जायचे आहे. तिकडे जाताना 'विवेक' बाळगण्याची आवश्यकता आहे. आजच्या 'ब्रेकिंग न्यूज' वाल्यांसाठी 'विवेक' हा सर्वांत मोठा गुण आवश्यक आहे. रामदासांनी दासबोधात जी 'महंत लक्षणे' सांगितली आहेत. त्यातली अनेक पत्रकारांना लागू पडतील. यातील पहिलीच ओवी लिहावे कसे, याचे मार्गदर्शन करणारी आहे.

*नेटके ल्याहावे । लिहोन शुद्ध शोधावे ।*
*शोधून शुद्ध वाचावे । चुको नये ॥१॥* ११/८

वार्ताहराने गोपनीयता राखून बातमी कशी मिळवावी, याचे दिग्दर्शन असे होते—

*जाणायाचे सांगता नये । सांगायाचे नेमस्त नये ।*
*समजल्यावीण काहीच नये । कोणी एक ॥३॥*
*हरिकथा निरूपण । नेमस्तपणे राजकारण ।*
*वर्तायाचे लक्षण । तेंहि असावे ॥४॥*
*पुसो जाणे सांगो नये । अर्थांतर करू जाणे ।*
*सकाळिकांचे राखो जाणे । समाधान ॥५॥* ११/८

पत्रकाराने कसे असावे—

*आहे तरी सर्वांठायी । पाहो जाता कोठेचि नाही ।*
*जैसा अंतरात्मा ठायींचा ठायी । गुप्त जाहला ॥१४॥*
*राखो जाणे नीति न्याय । न करी करवी अन्याय ।*
*कठीण प्रसंगी उपाय । करू जाये ॥१५॥* ११/८

ही महंतलक्षणे सर्वांनीच आचरणात आणावीत अशी आहेत. वर उल्लेखिलेली शेवटची ओवी खास करून ज्याच्या हाती काही सत्ता आहे, अधिकार आहे, मग तो खुर्चीचा असो वा लेखणीचा असो, त्या सर्वांना लागू पडते. पत्रकारांना तर न्याय, नीतीची चाड ठेवलीच पाहिजे; कारण अन्याय, अनीती यांच्याविरुद्ध लढणे हाच पत्रकाराचा धर्म असतो. त्याने अन्यायाविरुद्ध जसे ठामपणे उभे राहिले पाहिजे तसे त्यानेही कोणावर अन्याय करता कामा नये. गोपनीयतेचा उल्लेख वर केला आहेच. काही देशहिताची माहिती मिळाली असेल तर ती गुप्तरुपाने शासनयंत्रणेकडे कळविणे हेही पत्रकारांचे एक काम आहे. रामदासांनी शिवाजी महाराजांना पत्रे लिहिल्याचे माहिती आहेच. एक पत्र असे आहे की, चौदा ओळींच्या या पत्रातील प्रत्येक ओळीचे पहिले अक्षर घेतले की, 'विजापुरचा सरदार निघाला आहे' असा गुप्त संदेश तयार होतो. अर्थात् हे पत्र अस्सल आहे की नाही याबद्दल संशोधकांत दुमत आहे पण जर खरे असेल तर त्यामागची योजकता आणि सावधता ध्यानात येते. दुसरे असे की मुळातच ते गुप्त असल्याने ते कोणाचे आहे हे न समजण्याएवढी खबरदारी निश्चितच घेतली असावी.



अनुक्रमणिका

तात्पर्य एवढेच की पत्रकारांनी कोणतेही वृत्त देताना विवेक बाळगण्याची गरज आहे एवढा धडा घेतला तरी पुरे !

समर्थांची एक ओवी आहे, ती प्रसिद्ध आहे, ती अशी—

*पहिले हरिकथा निरूपण । दुसरे ते राजकारण ।*
*तिसरे ते सावधपण । सर्वांविषयी ॥*

यातील सर्व बाबतीत सावधपण हे अत्यंत महत्त्वाचे आहे; आणि पत्रकारांच्या दृष्टीने तर ते अधिकच महत्त्वाचे आहे. समाज किंवा राष्ट्रहिताच्या दृष्टीने कोणती बातमी द्यायची किंवा नाही वा कशा पद्धतीने द्यायची याचे तारतम्य पत्रकाराच्या अंगी असायलाच हवे. पत्रकाराने भाषा कशी वापरायला हवी याची सूचनाही रामदासांच्या लिखाणातून अनेक ठिकाणी मिळते. त्यांच्या भाषेबाबत प्रा. न. र. फाटक लिहितात, "समर्थांपाशी मराठी भाषा पाणी भरत होती असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही. जे सांगावयाचे ते मोजक्या ठसठशीत शब्दांत व निःसंदिग्धपणे सांगावे; अशी त्यांची दृष्टी होती. मात्र त्या शिकवणुकीत धाकदपटशा नसावा अशीही त्यांनी काळजी घेतल्याचा अनुभव येतो. शब्दासाठी ते कुठे अडून बसले नाहीत." (सार्थ दासबोध, संपादक-प्रा. न. र. फाटक, प्रस्तावना पृ. ११)

भाषेबद्दलची ही दखल किंवा जाणीव लिहिण्याचे माध्यम हाताळणाऱ्या सर्वांना असली पाहिजे. आज मराठी वृत्तपत्रांत अनेक इंग्रजी वा हिंदी शब्द सहजपणे वापरले जातात. रामदासांच्या भाषेचा विचार केला तर त्यांनी मराठी बाहेरचे अनेक शब्द वापरले आहेत. उदाहरणच द्यायचे असेल तर तुफान, जबर्दस्त, खबर्दार, बाजीगरी, बेईमान, कतार इत्यादी अनेक शब्द त्यांनी वापरले आहेत. म्हणजे भाषेत होणारी सरमिसळ रामदासांना मान्य होती. आजच्या पत्रकारितेतील भाषेसंबंधातले हे साम्य लक्षात घेण्यासारखे आहे.

पत्रकारांनी समाजाला अंधश्रद्धेपासून दूर ठेवले पाहिजे. त्यासाठी निरनिराळ्या माध्यमातून लिहित राहिले पाहिजे. रामदासांनी अनेक काव्यांमधून ते केले आहे. 'ब्राह्मण बुद्धिपासुनि चेवले' असे म्हणून त्यांनी ब्राह्मणांनाही फटकारले आहे. समाजातल्या भोंदू बुवाबाजी विरुद्ध त्यांनी परखडपणे भाष्य केले आहे. अशी त्यांची भाष्ये अग्रलेखाचे काम करतात. या गुरुबाजीबद्दल ते लिहितात,

*शिष्यास न लाविती साधन ।*
*न करविती इंद्रिये दमन ।*
*ऐसे गुरु अडक्याचे तीन ।*
*मिळाले तरी त्यजावे ॥*

आणखी एक एका ठिकाणी ते लिहितात,

*हे काय ! ते काय !*
*योग काय ! भोग काय !*
*अंतरी संसार काय !*
*बाहेर काषाय दंड काय !*
*आत अवघे भंड काय !*
*बाहेर सात्त्विक ध्यान काय !*
*आत मद्यपान काय !*
*रामदास म्हणे पाहे,*
*व्यर्थ भजन करून काय !*

ही कविता विनोदी आहे, उपरोधिक आहे आणि जळजळीत अंजन घालणारी आहे, इतकेच नव्हे तर ती मुक्तछंदातील नवकविता वाटावी एवढी ताजी आहे.

पत्रकारांनी स्वप्न पहायचे असते, वाचकांना दाखवायचे असते, ते फुलवायचे असते. रामदासांनीही 'आनंदवन भुवनी' मधून आदर्श राज्याचे स्वप्न पाहिले आहे. 'स्वप्नी जे जे देखिले रात्री । ते ते तैसेचि होतसे' म्हणून ते सारा आशावाद फुलवत नेतात. हे काव्य म्हणजे एखाद्या नियतकालिकातील ललित भावबंध म्हणावा लागेल.

या काव्यात भूतकाळ, वर्तमान आणि भविष्यकाळ यांचा उत्तम सांधा जोडला आहे.

*स्वधर्माआड जी विघ्ने । ते ते सर्वच उठीली ।*
*लाटिली कुटिली देवे । दापिली कापिली बहू ॥*
*खौंळले लोक देवाचे । मुख्य देवजि उठिला ।*
*कळेना काय रे होते । आनंदवनभुवनी ॥*
*देव देव बहू देव । नाना देव पदोपदी ।*
*दाटणी जाहाली मोठी । आनंदवनभुवनी ॥*
*गळाले पळाले मेले । जाले देशोधडी पुन्हा ।*
*निर्मळ जाहाली पृथ्वी । आनंदवनभुवनी ॥*

स्वप्नात जे पाहिले ते आठवले तसे लिहिले असे सांगून या स्वप्नकथेचा समारोप करताना पुन्हा एकदा आत्मविश्वासाने लिहितात,

*स्मरले लिहिले आहे । बोल्ता चाल्ता हडी ।*
*काय होईल पहावे । आनंदवनभुवनी ॥*



अनुक्रमणिका

*महिमा तो वर्णवेना । विशेष बहुतांपरी ।*
*विद्यापीठ ते आहे । आनंदवनभुवनी ॥*
*सर्व सद्या कळा विद्या । न भूतो न भविष्यति ।*
*वैराग्य जाहाले सर्वे । आनंदवनभुवनी ॥*

एकोणसाठ कडव्यांच्या दीर्घकाव्यातील ही कडवी-वाचताना अंगावर रोमांच फुलतो. स्वप्न आणि वास्तवाची सीमा रेषा पुसट करणारी ही भावना विलक्षण आहे. या काव्याबद्दल संत साहित्याचे गाढे व्यासंगी डॉ. शं. दा. पेंडसे म्हणतात, "... हिमालयातून खाली येणाऱ्या गंगेवर जसे जलकल्लोळ दिसतात तसे समर्थांच्या हिमालयसदृश प्रतिभेतून प्रकट होणारे भावकल्लोळ या प्रकरणात दिसतात. तिन्ही काळांप्रमाणेच अध्यात्मातील मुक्ती, भक्तीतील शक्ती आणि दिव्य कर्मातील दीप्ती यांचे असे काही विलक्षण मिश्रण या कवितेत आहे की, त्यामुळे ती काहीशी गूढ झाली आहे." ('राजगुरू समर्थ रामदास' पृ. ३४३)

वृत्तपत्रे वा नियतकालिकांमधून ज्या प्रमाणे विविध विषयांवर लेख येतात, सदरे असतात तशी बहुतेक विविधता समर्थांच्या वेगवेगळ्या विषयांवरच्या लेखांत आढळते. साहित्य, कला, उद्योग, आरोग्य, जीवनव्यवहार, जीवनशैली, उद्योग-व्यवसाय, निसर्ग अशा अनेक विषयांवर समर्थांनी लिहिले आहे. त्यांच्या साहित्यसूचीतील सगळी प्रकरणे पाहिल्यावर समर्थांचा आवाका किंवा त्यांची झेप किती मोठी होती याची कल्पना येते. वृत्तपत्रे वा आताच्या तत्सम माध्यमांची उपमा म्हणूनच रामदासांच्या या वाङ्मयीन उद्यमशीलतेला देता येते. त्यांच्या वेळच्या, आधीच्या वा नंतरच्या कोणीही साहित्यिकाने एवढ्या विषयांना एकट्याने हात घातलेला नाही. दासबोध, मनाचे श्लोक याखेरीज त्यांनी जे विषय हाताळले त्यात बाग प्रकरण, कारखाने प्रकरण, डफ गाणे सारखी लोकगीते, अनेक भीमरूपी स्तोत्र, आरत्या, पत्रे यांचा समावेश होता. यातील बाग प्रकरण आणि कारखाने प्रकरण यांत कृषी आणि बांधकाम उद्योगाशी संबंधित बरीच माहिती आहे. परळी येथे मठ स्थापण्याच्या वेळी परिसरात कोणत्या प्रकारची झाडे लावायची याची यादीच बागप्रकरणात येते. फुलझाडे, फळझाडे, शोभेची झाडे, वृक्ष अशांची असंख्य नावे सांगून शेवटी ते लिहितात,

*अठरा भार वनस्पती । नावे सांगावी किती ।*
*अल्प बोलिलो श्रोती । क्षमा केली पाहिजे ॥*

सामानगडावर किल्ला बांधताना लिहिलेल्या कारखाना या प्रकरणाच्या पहिल्या समासात विटा कशा कराव्यात, मजुरांकडून किती वेळ आणि कशी कामे करून घ्यावीत याची साद्यंत माहिती दिली आहे. विटेची लांबी ९ तसू, रुंदी सात तसू तर उंची तीन तसू असावी अशी खूप माहिती येते. या प्रकरणाच्या दुसऱ्या समासात इमारतीच्या बांधकामाची इत्थंभूत माहिती ते देतात. आजच्या वृत्तपत्रांत कलाविषयक सदरेही येतात. समर्थांच्या वाङ्मयातून हाही विषय वगळला गेलेला नाही. नृत्य आणि संगीताची त्यांना उत्तम जाण होती. नृत्यावर त्यांनी लिहिले आहे ते वाचताना सुद्धा समोर नृत्य चालू आहे असा भास व्हावा याचा प्रत्यय येतो. 'धन्य ते गायनी कळा' या ओळीने शेवट होणाऱ्या त्यांच्या ओव्या प्रसिद्ध आहेत. गाणे कसे असावे असे सांगताना ते लिहितात,

*बाळके श्वापदे पक्षी ।*
*लोधती वेधती मनी ।*
*चित्त निश्चिंत होतही ।*
*धन्य ते गायनी कळा ॥*

आणखी एका गोष्टीने रामदासांना खऱ्या अर्थाने पत्रकार म्हणता येईल; ती म्हणजे त्यांनी लिहिलेली पत्रे. त्यांची अशी काही पत्रे उपलब्ध आहेत. त्यात छत्रपती शिवाजी महाराज, छ. संभाजी राजे, थोरले बंधु श्रेष्ठ, मातोश्री इत्यादींना वेळोवेळी लिहिलेल्या पत्रांचा समावेश होतो. शिवाजी राजांना त्यांनी लावलेली विशेषणे आजही त्यांची मानाची बिरूदे झाली आहेत.

*निश्चयाचा महामेरू । बहुतजनांस आधारू ।*
*अखंड स्थितीचा निर्धारू । श्रीमंत योगी ॥*

अशा मायन्याने प्रसिद्ध असलेल्या या पत्रात राजांच्या अनेक गुणांचा उल्लेख रामदासांनी केला असून *'या भूमंडळाचे ठायी । धर्मरक्षी ऐसा नाही । महाराष्ट्र धर्म राहिला काही । तुम्हा कारणे ॥'* असे लिहून शेवट *'प्रसंग नस्तां लिहिले । क्षमा केले पाहिजे ॥'* असे म्हणून महाराजांची क्षमा मागितली आहे. हे पत्र म्हणजे आजच्या वृत्तपत्रीय भाषेत गौरवाचा अग्रलेखच होय. ११ एप्रिल १६५९ चे हे पत्र अनेक कारणांसाठी महत्त्वपूर्ण आहे. संभाजी राजांना त्यांनी लिहिलेले, 'अखंड सावधान असावे । दुश्चित कदापि नसावे' अशी सुरूवात असलेले

पत्र कोणत्याही काळातील सत्ताधाऱ्यांनी कसे वागावे याचा आदर्श वस्तुपाठच आहे. *आधी गाजवावे तडाके । मग भूमंडळ धाके । ऐसे न होता धक्के । राज्यास होती ।*

हा दिलेला इशारा हाही समाजाचे प्रहरी असलेल्या आधुनिक काळातील वृत्तपत्रकाराप्रमाणेच आहे. यातही शिवरायांचे मोजके गुण नेमकेपणाने सांगितले आहेत. आईला लिहिलेले पत्र म्हणजे 'आई' वरचे ते एक उत्तम भावगीतच म्हणावे लागेल. 'सकळ गुणांची निधी' असलेली आई आणखी कशी आहे ते सांगून शेवटच्या ११ व्या कडव्यात ते आईची थोरवी सांगतात,

*भावार्थाचे आगरू । प्रबळ शांतीचा सागरू ।*
*पाहता उपमे मेरू । तोही उणा ॥*

मेरू पर्वतही आईची उंची गाठू शकत नाही; असे म्हणणारे भावगर्भ रामदास इथे भेटतात. थोरल्या बंधुंनाही ते पत्रातून असेच गौरवतात. या सर्व पत्रांत अत्यंत आटोपशीर पण तरीही स्वच्छ शब्दांत आपल्या मनातील विचार वा भावनांना ते वाट करून देतात. वाचकांच्या पत्रव्यवहारातही छोटे पण आशय संपन्न पत्र कसे असावे याचा उत्कृष्ट नमुना अशीही ही पत्रे आहेत.

आजच्या प्रसारमाध्यमांत, वृत्तपत्रांत जे-जे असते ते बहुतेक सर्व विषय त्या काळाच्या गरजेनुसार आणि उपलब्धतेनुसार रामदासांनी लिहिले आहेत. पत्रकारांनी बातम्या कशा गोळा कराव्यात, त्यांचे समाजात वागणे कसे असावे याचेही मार्गदर्शन समर्थ रामदासांच्या लेखनात आले आहे, त्यामुळे रामदास हे पत्रकारही ठरू शकतात अशी माझी भावना आहे. नव्या पत्रकारांना शिकण्यासारखेही त्यांचेकडून खूप मिळते, कारण ते 'आधी केले मग सांगितले' या पंथातले आहेत. 'दासबोध' आणि 'आत्माराम' किंवा 'मनोबोध' हे त्यांचे आजच्या वृत्तपत्रीय भाषेतील 'विशेषांक' ठरावेत !

❖❖❖

**मधु नेने**
'हिरण्यकेशी', १२७ गंगापुरी, वाई, जि. सातारा - ४१२८०३
फोन : ०२१६७/२२०६९०, ९८८१२०८७६०

# ❑ जीवनदृष्टी देणारा 'मनोबोध' ❑



शीला निपुणगे

महाराष्ट्रातील संतपंचकामध्ये समर्थ रामदासांचे स्थान वैशिष्ट्यपूर्ण ठरते ते त्यांच्या आगळ्यावेगळ्या जीवनदृष्टीमुळे !

रामदासांच्या तत्त्वज्ञानात 'प्रपंच' आणि 'परमार्थ' किंवा 'व्यवहार' आणि 'अध्यात्म' यांची मनोज्ञ सांगड घातलेली आढळते; याचे कारण सर्वसामान्य संसारी माणसाविषयी त्यांच्या अंतरंगी असलेला कळवळा !

ज्ञानेश्वर-तुकाराम-एकनाथादि संतांनीही जनसामान्यांना आत्मोद्धाराचा मार्ग दाखविला; परंतु रामदासांचे सरळ, प्रांजळ, सोपे आणि रोखठोक निवेदन सामान्यातल्या सामान्यालाही चटकन भावते; कारण आपल्या वाङ्मयातून त्यांनी दैनंदिन जीवन यशस्वीपणे जगून त्याचे सार्थक करण्याचा मूलमंत्रच दिला आहे !

'श्रीमनाचे श्लोक' ही समर्थांची सकृद्दर्शनी बाळबोध भासणारी रचना– शाळकरी मुलांनीही मुखोद्‌गत करावी अशी; पण समर्थांनी त्यातून जो **'मनोबोध'** केला आहे तो जीवनाचे सार सांगणारा आहे. त्याची अर्थगर्भता आणि त्याचे महत्त्व स्थलकालातीत आहे !

या मनाच्या श्लोकांची जन्मकथाही विलक्षण अशीच आहे !

चाफळला श्रीराममंदिराची स्थापना झाल्यानंतर तेथे दरवर्षी मोठा उत्सव होत असे. त्यासाठी पंचक्रोशीतून भिक्षारूपाने धान्य गोळा केले जाई. पुढे छत्रपती शिवाजी. महाराजांनी या उत्सवासाठी दरसाल निधी देण्यास सुरुवात केली.

एके वर्षी मात्र ही मदत येण्यास विलंब झाला. झाले ! सारे शिष्य हवालदिल झाले. समर्थांना हे समजले, तेव्हा त्यांनी कल्याणस्वामींना बोलावून घेतले आणि त्याच रात्री एका बैठकीत हे 'मनाचे श्लोक' त्यांना सांगितले. पहाटेपर्यंत २०५ श्लोक लिहून पूर्ण झाले होते !

शिष्यांकडून त्यांच्या प्रती करवून घेऊन समर्थांनी त्यांना भिक्षेसाठी पाठविले. प्रत्येक घरासमोर उभे राहून, एक श्लोक म्हणायचा व मिळेल ती भिक्षा घेऊन पुढे जायचे, असे करताकरता आठवड्याच्या आतच भरपूर शिधा गोळा झाला.

शिष्यांना कृतिप्रवण करणारे हे श्लोक लिहून रामदासांनी अखिल मानवजातीलाच कल्याणाचा मार्ग दाखविला आहे.

श्लोकांच्या सुरुवातीस रामदासांनी बुद्धिदाता गणेश आणि विद्येची अधिष्ठात्री देवता सरस्वती यांना वंदन केले आहे.

*'गणाधीश जो ईश सर्वा गुणांचा ।*
*मुळारंभ आरंभ तो निर्गुणाचा ।*
*नमूं शारदा मूळ चत्वार वाचा ।*
*गमूं पंथ आनंत या राघवाचा ॥'*

भक्तांसाठी 'सगुण' आणि साधकांसाठी 'निर्गुण' असलेला 'ओंकारस्वरूप' गजानन आणि परा, पश्यंती, मध्यमा, वैखरी या चारही वाणींचे सामर्थ्य असलेली शारदा यांना नमून परमार्थमार्ग चोखाळायचा आहे.

दुसऱ्या श्लोकापासून प्रत्यक्ष मनोबोधास सुरुवात होते. 'मना सज्जना भक्तिपंथेंचि जावें' या पहिल्या चरणातच मनाची निर्मळता, पावित्र्य गृहीत धरून समर्थ,

'जीवनात कसे वागावे' याचा वस्तुपाठ समोर ठेवीत गेले आहेत.

मनाला केलेल्या या उपदेशात 'मूल्यविचार' महत्त्वाचा आहे, तशीच कृतिशीलताही महत्त्वाची आहे. परद्रव्य, परस्त्री यांविषयी अनभिलाषा, देहबुद्धीचा त्याग, मृत्यूची जाणीव, संतसंगतीचा महिमा आणि या सर्वांना व्यापून दशांगुळे उरलेले रामनामाचे माहात्म्य अशा वेगवेगळ्या टप्प्यांमधून रामदासांनी जीवनाचे मर्म सांगितले आहे. याच वेळी अहिल्या, द्रौपदी, भक्त प्रल्हाद, ध्रुव बाळ, रावण, महाबली हनुमान, रामसेतू, विठ्ठल, अंबरीश राजा, अजामेळ, गजेंद्र, उमा-सदाशिव अशा विविध प्रकारच्या उदाहरणांमधून त्यांनी रामभक्तीचे महत्त्व मनावर बिंबविले आहे.

समर्थांच्या रामभक्तीचे वैशिष्ट्य हे, की ती भक्ती 'डोळस' आहे. मुखाने रामनाम घेताना आयुष्यात 'राम' निर्माण करण्याचा उचित मार्ग ते दाखवितात आणि पोटतिडिकीने त्याचे समर्थनही करतात.

*'मना सज्जना भक्तिपंथेंचि जावें ।*
*तरी श्रीहरी पाविजे तो स्वभावें ।*
*जनीं निंद्य तें सर्व सोडूनि द्यावें ।*
*जनीं वंद्य तें सर्व भावें करावें ॥'*

असे सांगताना अगदी अल्पाक्षरात त्यांनी सारासार विवेक सुचविला आहे; भक्तिमार्गाने जाताना 'निंद्य' ते टाळले पाहिजे. यासाठी अंगी फार मोठे धैर्य पाहिजे. निंदा सहन करण्याची शक्ती पाहिजे आणि सर्वांशी लीनतेने वागून सज्जनांची अंतःकरणे जिंकता आली पाहिजेत.

जगाला 'वंद्य' असे आचरण कसे असावे हे समर्थांनी पुढच्याच श्लोकात अत्यंत मार्मिकतेने सांगितले आहे. ते म्हणतात—

*प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ।*
*पुढे वैखरी राम आधी वदावा ।*
*सदाचार हा थोर सांडू नये जो ।*
*जनीं तोचि तो मानवीं धन्य होतो ॥*

प्रातःकाळी- दिवसाची सुरुवात होताना— मनात रामाचे स्मरण करावे. त्यानंतर 'वैखरी' या श्रेष्ठ वाणीने त्याचे नामस्मरण करावे आणि दिवसभरात सदाचाराचीच कास धरावी. थोडक्यात— विचार, उच्चार आणि आचार हे तीनही 'रामरूप' असावेत. हे सोपे थोडेच आहे ?

हे साध्य करण्यासाठी प्रथमतः **'अहंता'** त्यागणे महत्त्वाचे आहे. समर्थ म्हणतात—

*'अहंतागुणें नीति सांडी विवेकी ।*
*अनीतीवळें श्लाघ्यता सर्व लोकीं ।*
*परी अंतरीं सर्वही साक्ष येते ।*
*प्रमाणांतरे बुद्धि सांडूनि जाते ॥'*

अहंकारामुळे नीतिमूल्यांची पायमल्ली होते. अनीतीच्या मार्गानेच सत्ता-संपत्ती, मान-सन्मान मिळविण्याचा मोह होतो. अशा माणसाला स्वतःच्या अनाचारांची अंतर्यामी पूर्ण जाणीव असते; परंतु अति अहंकारामुळे त्याची बुद्धी भ्रष्ट झालेली असते. म्हणून समर्थ कळकळीने सांगतात—

*'मना वासना दुष्ट कामा नये रे ।*
*मना सर्वथा पापबुद्धी नको रे ।*
*मना धर्मता नीति सोडू नको हो ।*
*मना अंतरीं सार-वीचार राहो ॥...'*

बाष्कळपणाचा त्याग करून **कृतिशीलता** अंगिकारली पाहिजे. हे सांगताना समर्थ म्हणतात—

*'फुकाचें मुखीं बोलतां काय वेंचें ? ।*
*दिसेंदिस अभ्यंतरीं गर्व सांचे ।*
*क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे ।*
*विचारे मना तूंचि शोधूनि पाहे ॥'*

अधर्माचरण, अनीती, दुराचार यांची जाणीव मनाला असतेच असते. ज्याचा त्यानेच हा शोध घ्यावा— स्वतःच स्वतःला शोधावे— हा लाखमोलाचा विचार समर्थांनी येथे किती साध्या शब्दांत मांडला आहे !

समर्थांच्या शैलीचे वेगळेपण यातच आहे. अध्यात्माचे निरूपण करतानाही त्यांची भाषा रोखठोक, परखड, स्पष्ट आहे. कधी ती बाळबोध आहे, तर कधी रांगडी ! पण तुकारामांप्रमाणेच— 'बुडते हे जन न देखवे डोळां ।' अशी लोकोद्धाराची तीव्र आस त्यांच्या शब्दाशब्दांतून ओतप्रोत भरली आहे.

'अहंते'चे मूळ देहबुद्धीत आहे, हे समर्थांनी जाणले होते, ते प्रत्येकानेच जाणून घ्यावे आणि 'देहबुद्धी'चा जाणीवपूर्वक त्याग करावा असे समर्थ परोपरीने समजावून सांगतात. देहभाव नाहीसा व्हायचा असेल, तर षड्रिपूंवर मात करता आली पाहिजे.

*'नको रे मना क्रोध हा खेदकारी ।*





अनुक्रमणिका

*नको रे मना काम नाना विकारी ।*
*नको रे मदा लोभ हा अंगिकारूं ।*
*नको रे मना मत्सरूं दंभ भारूं ॥'...*

काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर या शत्रूंपासून मुक्तता मिळाल्यावर दुःख ते कोणते ? म्हणूनच समर्थ म्हणतात–

*'मना, मानसीं दुःख आणूं नको रे ।*
*मना, सर्वथा शोक चिंता नको रे ।*
*विवेकें देहेबुद्धि सोडूनि द्यावी ।*
*विदेहीपणें मुक्ति भोगीत जावी ॥'*

देह हा शेवटी नश्वर आहे; त्यामुळे त्याला होणारे सुख किंवा दुःख हेही क्षणभंगुर आहे. म्हणूनच–

*'देहे दुःख तें सूख मानीत जावें ।*
*विवेकें सदा सस्वरूपीं भरावें ॥'*

पण हा मार्ग सोपा नव्हे !

*'सुखदुःखें समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ ।'*

हे भगवद्गीतेतील 'स्थितप्रज्ञा'चे लक्षणच समर्थांनी येथे सोप्या शब्दांत वर्णिले आहे.

याला पुष्टी देताना– 'जगीं सर्वसूखी असा कोण आहे?' असे विचारून समर्थ म्हणतात की, 'हे मना, तुझे जसे पूर्वसुकृत असेल, त्याप्रमाणेच तुला फळ मिळेल ! ते भोगणे क्रमप्राप्तच आहे !'

'देहबुद्धी'चा त्याग करण्याचे आणखी एक कारण समर्थ सांगतात, ते म्हणजे 'मृत्यू' ! या मृत्यूचे रामदासांनी दासबोधात जे वर्णन केले आहे, त्याला खरोखरच तोड नाही !

*'मृत्यू न म्हणे बलाढ्य । मृत्यू न म्हणे धनाढ्य ।*
*मृत्यू न म्हणे आढ्य । सर्वगुणें ॥...*
*मृत्यू न म्हणे थोरथोर । मृत्यू न म्हणे हरिहर ।*
*मृत्यू न म्हणे अवतार । भगवंताचे ॥'...*

अशी मृत्यूची ख्याती ! म्हणूनच–

*'देहेरक्षणाकारणें येत्न केला ।*
*परी शेवटीं काळ घेऊनि गेला ।*
*करी रे मना भक्ति या राघवाची ।*
*पुढें अंतरीं सोडि चिंता भवाची ॥'*

असा बोध रामदासस्वामी मनाला करतात. काळ घडीघडीने आयुष्य घेऊन जात असतो. शेवटी, देहान्तसमयी कोण कोणाचा असतो ?

यासाठी **संत-सज्जनांची संगत** धरावी

*'धरी रे मना संगती सज्जनाची ।*
*जेणें वृत्ति हे पालटे दुर्जनाची ॥'*

असा **संतसंगती**चा महिमा आहे.

संतांच्या संगतीचे महत्त्व वर्णन करतानाच रामदास रामाला कल्पद्रुमाची उपमा देतात. या कल्पतरूच्या खाली उभा राहून जो दुःखाचा (वाईट गोष्टींचा) विचार करतो, तो करंटाच नव्हे काय ? त्याची अवस्था 'घरी कामधेनू, पुढे ताक मागे' अशीच झाल्यास नवल काय ? अशा मूढांच्या हरीबोध पचनी पडत नाही; त्यांना व्यर्थ वादविवादातच रस वाटतो.

*'अती मूढ त्या दृढ बुद्धी असेना ।*
*अती काम त्या राम चित्ती वसेना ।*
*अती लोभ त्या क्षोभ होईल जाणा ।*
*अती वीषई सर्वदा दैन्यवाणा ॥'...*

सन्मार्गाकडे पाठ फिरविणाऱ्या अज्ञानी माणसाचे हे लक्षण सांगतानाच रामदास खरा योगी कोण तेही सांगतात.

'ज्यांच्या अंगी गर्व नाही, दया-क्षमा-शांती जेथे वास करतात, ज्याला लोभ नाही, त्यामुळे क्षोभ नाही. अर्थातच यामुळे जो दैन्यवाणा नाही, तोच खरा 'योगीराजा' ! त्याच्या संगतीत जीवनाचे साफल्य आहे; पण– *'जुनें ठेवणें मीपणें आकळेना ।'* अशी सर्वसामान्यांची गत असते. यासाठी 'पुढें सर्व जाईल कांहीं न राहे' अशी सूचना देऊन समर्थ म्हणतात– *'मना संत आनंत शोधूनि पाहे ॥'*

या संतसंगतीत मिळणारे समाधान अलौकिक असते. पिंडज्ञान, तत्त्वज्ञान, योगयाग यांपैकी कशातूनही न मिळणारी तृप्ती सज्जनांच्या सहवासातून प्राप्त होते. यासाठी मनाचा दृढ निश्चय मात्र पाहिजे.

*'हरीचिंतनें मुक्तिकांता वरावी ।*
*सदा संगती सज्जनाची धरावी ॥'*

येथे–

*'तुका म्हणे मुक्ती परिणली नोवरी ।*
*आता दिसे चारी खेळोमेळी ॥'*

या तुकारामांच्या आत्मप्रचीतीचाच पुनःप्रत्यय येतो. 'Great minds think alike' या वचनानुसार सर्व थोर संतांच्या विचारसरणीत मोठे साधर्म्य आढळते. 'संतसंगती'

बाबतचा त्यांचा दृष्टिकोनही याला अपवाद नाही.

संतसंगती आणि **अनन्य रामभक्ती** यांच्या आधारे भवसागर लीलया पार करता येतो. अर्थात् या भक्तिमार्गात **नाममाहात्म्य**ही अनन्यसाधारण आहे.

*'मुखीं नाम नाहीं तया मुक्ति कैंची ?।*
*अहंतागुणें यातना ते फुकाची ॥'*

असे सांगून समर्थ म्हणतात की— 'पुढे दैन्यवाणा अंत येईल, यासाठी रामनामाची कास धरा. हरीनामाने पाषाणही तरले. अजामेळ, प्रल्हाद उद्धरून गेले. असा त्याचा अपरंपार महिमा आहे !'

ज्याचे नाम असे श्रेष्ठ, तो **राम** जेथे आहे, तेथेच सर्व प्रकारचा **विश्राम** आहे. शांती आहे. तृप्ती आहे. म्हणूनच— *'मना सज्जना राघवीं वस्ति कीजे'* असे समर्थ बजावतात.

ज्याची थोरवी वेद, शास्त्रे, पुराणे गातात, कामदेवाला जाळून टाकणारा शिवशंकर ज्याला ध्यातो, त्या कोदंडधारी, घनःश्याम राघवाचे ठायी चित्तवृत्ती लीन करण्याचा, इतकेच नव्हे तर त्याच्या ठिकाणी आपले अस्तित्त्व विलीन करण्याचा सोपा मार्ग समर्थ दाखवितात. *'ल्पावें अती आदरें रामरूपीं'* या त्यांच्या वचनात हाच अर्थ अभिप्रेत आहे.

काया-वाचा-मनेकरून रामाला शरण गेल्यानंतर तो अशा अनन्य भक्ताची कदापि उपेक्षा करणार नाही अशी ग्वाहीही ते देतात.

*'सदा सर्वदा देव सन्नीध आहे ।*
*कृपाळूपणें अल्प धारिष्ट पाहे ।*
*सुखानंद आनंद कैवल्यदानी ।*
*नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ॥...'*

चिरंतन अशा कैवल्याचे दान मिळाल्यानंतर आणखी मागणे ते कोणते ?

*'सदा सर्वदा योग तूझा घडावा ।*
*तुझें कारणीं देह माझा पडावा ॥*
*उपेक्षू नको गूणवंता अनंता ।*
*रघूनायका मागणें हेंचि आता ॥'*

...सर्व आशा-आकांक्षा रामचरणी स्थित होतात, तेव्हा मागण्यासारखे काही उरतच नाही ! त्याची कृपा असावी. बस्स !

नरजन्माचें सार्थक करण्याचा सहजसुलभ भक्तिमार्ग रामदासस्वामींनी 'मनोबोधा'च्या रूपात मांडला. वरवर पाहता हे श्लोक सोपे वाटतात, परंतु तपस्वी रामदासांनी त्यांमध्ये अध्यात्मातील गहन असे अद्वैत तत्त्वज्ञान फार खुबीने गुंफले आहे. समर्थांची उदात्तता, त्यांच्या विचारांची उत्तुंगता, त्यांच्या व्यक्तिमत्त्वातील दिव्यता, उत्कटतेचा आणि भव्यतेचा त्यांना असलेला नितांत ध्यास आणि या सर्वांना वेढून असलेली त्यांची विरागी वृत्ती या सर्वांचे सम्यक् प्रतिबिंब मनाच्या श्लोकांमध्ये पाहावयास मिळते.

हा मनोबोध सर्वसामान्यांच्या मनावर पूर्णपणे ठसावा यासाठी 'प्रभातें मनीं राम चिंतीत जावा' 'जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा' अशा चौथ्या चरणाची हेतुपुरस्सर पुनरावृत्ती ते अनेक श्लोकांमध्ये करताना दिसतात; त्यामुळे त्यांच्या रचनेला जसे वजन प्राप्त होते, तसाच त्यांच्या विचारातील स्पष्टता, दृढता, निग्रह यांचाही प्रत्यय येतो. त्यांचे सडेतोड पण पोटातून आलेले निवेदन अंतःकरणाला भिडून जाते.

शेवटच्या श्लोकात— *'मनाची शतें ऐकतां दोष जातीं ।'* असे रामदासांनी म्हटले आहे. आपत्काळात या श्लोकांचे अर्थासह पठण केले, तर नवी उमेद मिळते. जीवनाकडे पाहण्याची नवी दृष्टी प्राप्त होते असा अनेकांचा अनुभव आहे. यापेक्षा यांचे मोठेपण ते कोणते?

*'उत्कट भव्य तेंचि घ्यावें ।*
*मळमळीत अवघेंचि टाकावें ।*
*निःस्पृहपणें विवरावे व्हावें ।*
*भूमंडळीं ॥'*

असा बोध समर्थांनी दासबोधात केला आहे.

ही **निःस्पृहता** अंगी बाणण्यासाठी या **'मनोबोधा'**चे **आचरण** हा सहजसाध्य मार्ग आहे, असे वाटते. वरवर तो सोपा; पण... आचरायला खरोखर किती कठीण... !

'कल्याण करी रामराया । जनहित विवरी...।' असे रामाला आंतरिक तळमळीने विनविणाऱ्या रामदासांचा हा उपदेश समस्त मनुष्यमात्रांना चिरंतन कल्याणाचा मंत्र देणारा आहे, यात मात्र तिळमात्र संदेह नाही !

❖❖❖

**शीला निपुणगे**
२, कस्तुरी सोसायटी, ३७१ब, शनिवार पेठ, पुणे ४११ ०३०.





अनुक्रमणिका

# भक्तिसाहित्य : स्रोत आणि फलश्रुती : समर्थ रामदास

## एक अभिनव संशोधनग्रंथ




डॉ. माहेश्वरी गावित

'मराठी भक्तिसाहित्याचे स्रोत' या विषयांतर्गत शिवकालातील श्री संत रामदास आणि रामदासी संप्रदाय यांच्या भक्तिसाहित्यावर राज्यस्तरीय चर्चासत्राचे आयोजन पेमराज सारडा महाविद्यालय, अहमदनगर येथे ११ व १२ मार्च २००६ मध्ये घडले. हे चर्चासत्र अनेक दृष्टीने वैशिष्ट्यपूर्ण ठरले. एकतर शिवकालातील समकालीन संतांमध्ये रामदासांचे वेगळेपण आणि दुसरे म्हणजे या चर्चासत्रातील डॉ. सदानंद मोरे, डॉ. श्री. व सौ. तडकोडकर, समर्थ विद्यापीठाचे कुलगुरू सुधाकर दाभोळकर आणि समर्थांवर कादंबरी लिहिणारे रवींद्र भट यांची उपस्थिती. या चर्चासत्रावर आधारित एका संदर्भग्रंथाची निर्मिती व्हावी, असा संकल्प चर्चासत्राचे समन्वयक डॉ. मच्छिंद्र मालुंजकर यांनी केला आणि हा संदर्भग्रंथ श्री समर्थ रामदास चतुःशताब्दी वर्षात सिद्ध व्हावा असे ठरले. दास्ताने रामचंद्र आणि कंपनी, पुणे या प्रकाशनसंस्थेने या ग्रंथाची जबाबदारी स्वीकारली आणि 'भक्तिसाहित्य : स्रोत आणि फलश्रुती' (शिवकाल - रामदास - रामदासी संप्रदाय) असा ग्रंथ प्रसिद्ध झाला आहे. डॉ. मच्छिंद्र मालुंजकर यांनी संपादित केलेल्या या ग्रंथात रामदासांच्या व्यक्तिमत्त्वाचे आणि साहित्याचे वेगळेपण, शिवकाल आणि शिवकालीन साहित्य यांच्या संदर्भात, साम्य आणि भेद यांची चिकित्सा करीत स्पष्ट झाले आहे. डॉ. सदानंद मोरे यांचा 'शिवकालीन सांस्कृतिक पार्श्वभूमी व साहित्य' हा लेख या दोन्ही गोष्टींवर प्रकाश टाकणारा आहे. प्राचार्य डॉ. अनिल सहस्रबुद्धे, डॉ. लीला गोविलकर, डॉ. प्रभा देशपांडे, सु. न. दाभोळकर या लेखकांनी रामदासांचे व्यक्तिमत्त्व आणि साहित्य यांचे वेगळेपण तसेच रामदासी संप्रदायाचे वेगळेपण सोदाहरण स्पष्ट केले आहे. डॉ. सु. प्र. कुलकर्णी, डॉ. यशवंत पाठक यांनी 'युगधर्म आणि महाराष्ट्रधर्म' यावर प्रकाश टाकला आहे. डॉ. सु. म. तडकोडकर यांनी रामदासांच्या स्फुट कवितांवर स्वतंत्रपणे भाष्य केले आहे, तर प्रा. प्रियदर्शनी तडकोडकर यांनी रामदास संप्रदायातील शिष्या वेणाबाई व सोसूंबाई केंकरे यांच्या कार्याचा परिचय घडविला आहे. डॉ. अविनाश आवलगावकर यांनी 'दासबोधातील विचारसौंदर्य' उलगडले आहे, तर श्री. रवींद्र भटांनी 'रामदासांच्या समाजप्रबोधना'वर भाष्य केले आहे. डॉ. मधुसूदन बोपर्डीकरांनी 'रामदासांच्या गुरूभक्ती'ची मीमांसा केली आहे. या सर्व लेखांबरोबर डॉ. मुहंदम आजम यांनी श्रीमनाचे श्लोकचा दखनी अवतार 'मनसमझावन' हा वैशिष्ट्यपूर्ण लेख मांडून समकालीन अमराठी भाषिक साहित्यिकांनी रामदासांच्या साहित्याचा केलेला अनुवाद मांडला आहे.

प्रस्तुत ग्रंथ हा चर्चेतून सिद्ध झाला असल्यामुळे श्रीसमर्थ रामदासांनी मांडलेल्या महाराष्ट्रधर्म, मनाचे श्लोक आणि दासबोध या तिन्ही गोष्टींवर अतिशय मूलगामी चर्चा घडली आहे. कोणत्याही एकाच लेखकाने रामदासांविषयी मांडलेल्या चिंतनापेक्षा हे लेखन मूलगामी स्वरूपाचे संशोधन म्हणून पुढे आले आहे. त्यामुळे या ग्रंथाचा उपयोग सांप्रदायिकांना जसा होईल, त्यापेक्षा अभ्यासकांना संप्रदाय आणि साहित्य समजून घेण्यासाठी



अनुक्रमणिका

अधिक होईल असे या ग्रंथाचे स्वरूप आहे. डॉ. मच्छिंद्र मालुंजकर यांनी आपल्या 'संपादकीया'त मध्ययुगीन कालखंडात निर्माण झालेल्या संप्रदायांचे वैशिष्ट्य स्पष्ट करून प्रत्येक संतांचा, संप्रदायाचा दृष्टिकोण, उपास्यदैवत, सांप्रदायिक लोक आणि त्यांच्या भक्तीचे स्वरूप यावर चिंतन केलेले आहेच, त्यापेक्षा महत्त्वाची गोष्ट म्हणजे भक्तिरस संकल्पनेवर त्यांनी विशेष भाष्य केले आहे. ते मराठी साहित्याभ्यासाच्या दृष्टीने अधिक महत्त्वाचे आहे. चर्चासत्रावर आधारित असा हा स्वतंत्र संदर्भग्रंथ निर्माण झालेला आहे. त्याचे वैशिष्ट्य म्हणजे केवळ चर्चासत्रात सादर झालेल्या शोधनिबंधांचा एक संग्रह असे स्वरूप नसून निश्चित दिशेने संप्रदायाच्या अंगाने भक्तिसाहित्याच्या स्रोताचे स्वरूप प्रत्यक्ष रामदासांचे साहित्य आणि त्याचा सांप्रदायिक विनियोग यावर विशेष चिंतन करून अतिशय सूत्रबद्धतेने या ग्रंथाची मांडणी केली आहे. या सर्व दृष्टींने डॉ. मालुंजकर, पेमराज सारडा महाविद्यालयातील मराठी विभाग आणि प्रेमराज सारडा महाविद्यालय यांचा अशा प्रकारचा ग्रंथनिर्मितीचा उपक्रम अभिनंदनीय व अनुकरणीय आहे. कोणतेही संशोधन असे समूहाकडून निश्चित दिशेने घडले तर त्या संशोधनाचे मूल्य संशोधनक्षेत्राच्या दृष्टीने फार मोठे असते. यादृष्टीने हा ग्रंथ एक वस्तुपाठ आहे असे म्हणता येईल.

❖❖❖

भक्तिसाहित्य : स्रोत आणि फलश्रुती, संपादक : डॉ. मच्छिंद्र मालुंजकर
मराठी विभाग प्रेमराज सारडा महाविद्यालय, अहमदनगर
प्रकाशक : दास्ताने रामचंद्र आणि कंपनी, पुणे
प्रथमावृत्ती : एप्रिल २००८, पृष्ठ संख्या : १५२, मूल्य : ९०

**डॉ. माहेश्वरी गावित**
अहमदनगर

---

## स्वागत

प्रासंगिक : (वै.) चंद्रकांत जोशी - प्रियांजली, पुणे (१२८)
गिघाडं : (कथा) मनोहर भानत - प्रियांजली, पुणे (१५२)
विधिलिखित : (कथा) मंदा खापरे - प्रियांजली, पुणे (१६८)
निवडक स्तोत्रं : शं. बा., अरविंद, पुणे (१०२)
भारतवर्षाची सांस्कृतिक घडण : शं. बा., अरविंद, पुणे (१०२)
अस्मितादर्श समीक्षा : अनिल गजभिसे - अहल्या प्र. इंदूर (१४८)
मोहनमाया : (चरित्र) रामदास भटकळ, मौज, मुंबई (३१२)
कहाणी एका लोक विलक्षणाची : (चरित्र) - (येवंगनी येवतुशेन्को) अनु. भगवंत क्षीरसागर, संगत प्र. नांदेड (१३३)
महाकवी वॉल्ट व्हिटमन यांचा कविता : (अनु.) - भगवान : ढग - महाराष्ट्र अनुवाद परिषद प्र., बुलढाणा.
वाङ्मयीन चळवळी आणि दृष्टिकोन : (समीक्षा - संपादन) सुमती लांडे, शब्दालय, श्रीरामपूर (१५४)
झुला : (कथा) शुभदा कुलकर्णी, मधुश्री, पुणे (१६६)
सांगमना, ऐक मना ! : रिज़वाना कश्यप (संकलन) स्नेहवर्धन, पुणे (८८)
इस्लाम - स्टार्क रिॲलिटी : डॉ. जी. आर. मुल्ला (इंग्रजी व मराठी) अनु. डॉ. शशिकांत देशपांडे, रेस्ट, पुणे
चैत्र पालवी : (काव्य) विलास मोरे - मधुराज, पुणे.
आदिवासी कवितेचा उषःकाल आणि सद्यस्थिती : (समीक्षा) डॉ. तुकाराम रोंगटे, संस्कृति प्र. पुणे.
आदिवासी मुस्लिम ख्रिश्चन साहित्यमीमांसा : (समीक्षा) - डॉ. श्रीपाल सबनीस, अनुबंध, पुणे (२०८)
कविता दीक्षेच्या : (काव्य) - महेंद्र पाटील शब्दालय, श्रीरामपूर
भक्तिसाहित्य : (समीक्षा) - प्रा. डॉ. मच्छिंद्र मालुजकर, दास्ताने, पुणे
प्राजक्तवेणा : (काव्य) संपा. डॉ. शंतनू चिंधडे, चंद्रकला प्र., पुणे
मालविका : (काव्य) विश्वास वसेकर, स्नेहवर्धन, पुणे (११०)
चिमणचारा : सौ. सुजाता उपाध्ये - कमलप्रभा, पुणे (३२)
विचारज्ञान : ॲड. शैलजा मोळक, कि प्रकाशन, पुणे
क्रांतीजोती : ॲड. शैलजा मोळक, कि प्रकाशन, पुणे (१२)
स्वातंत्र्यसौदामिनी, महाराणी ताराराणी : कि प्रकाशन, पुणे (१२)
महाराणी येसूबाई, महाराणी ताराराणी : कि प्रकाशन, पुणे (१६)
तेजस्वी क्रांतिकन्या मादाम कामा : शरयू सोनावणे, टि.म.वि., पुणे (५६)
तरंग : (कविता) सौ. विजया व्यंकटेश देशपांडे, ब्ल्यू बर्ड (इंडिया) लि. (६८)
विद्रोह - विज्ञान आणि विश्वात्मकता : संपादक - महेंद्र गायकवाड, संघर्ष, नागपूर (१७६)
शामरंग : (कविता) पां. ह. कुलकर्णी - साहित्य आनंदमाला, पुणे (१२४)
उमंग : गिरीराजकुमार घुमाळ - ज्ञानदेवी साहित्य अकादमी, टिटवाळा (५६)

❖❖❖





अनुक्रमणिका

# विजय तेंडुलकर : प्रतिमा आणि प्रतिभा



डॉ. वि. भा. देशपांडे

विजय तेंडुल्कर गेले, ही बातमी जेव्हा ऐकली तेव्हा अनेक तरंग मनात उमटत राहिले. तसे त्यांचे जाणे वयपरत्वे आणि आजारपरत्वे आपण समजू शकतो. पण ते जाणे देहाचे आहे. ती व्यक्ती गेल्यावर तिच्या कर्तृत्वाचा आलेख आपल्या डोळ्यांसमोर सरकत जातो. तो एकत्रित स्वरूपात समोर आल्यावर आपण काहीसे स्तिमित होतो. कारण आपल्या ध्यानात येते, की तेंडुल्कर हे केवळ नाटककार नव्हते, तर ते कथाकार, एकांकिकाकार, कादंबरीकार, स्तंभलेखक, सामाजिक प्रश्नांचे विश्लेषक, ललितलेखक, पत्रकार, पटकथाकार आणखी खूप काही होते !

असे बहुआयामी, बहुरूपी समजावून घेणे किंवा देणे, तितके सोपे नाही, हेही आपल्या ध्यानात येते. गेली चाळीस-पंचेचाळीस वर्षे मी तेंडुल्करांना दुरून-जवळून पाहतो आहे, ऐकतो आहे, वाचतो आहे, आणि त्यांच्याशी संवादही करतो आहे. तरीही त्यांच्या व्यक्तित्वाचे आणि लेखनाचे आकलन पूर्णतः झाले आहे असे वाटत नाही. प्रत्येक कलाकृतीच्यावेळी त्यांच्या लेखनाचा, तसेच त्यांच्या व्यक्तित्वाचा पैलू आपल्याला आवाहन करीत जातो, असे नवे आकलन आपल्याला 'श्रीमंत' करून जाते. त्याचबरोबर ध्यानात येते की, अशा नव्या आकलनामध्येच किंवा त्या नव्या आव्हानांमध्येच त्यांच्या लेखनाची अभिजातता अवगुंठित झालेली आहे. अभिजात कलाकृतीतले सनातनत्व, चिरकालिकता यांचा प्रत्यय येत राहतो. तो अनुभव घेत असतानाच ध्यानात येते की, आधुनिक काळात (१९५०नंतर) मराठी नाटक-रंगभूमीच्या क्षेत्रात ज्या नाटककाराचे नाव भारतीय स्तरावर गेले; आणि टिकून राहिले ते नाव फक्त विजय तेंडुल्करांचेच होते. या आधुनिक कालखंडात ज्या भारतीय नाटककारांची नावे सतत घेतली जातात, त्यामध्ये मोहन राकेश, बादल सरकार, गिरीश कर्नाड, मोहित चटोपाध्याय, आद्य रंगाचार्य या नावांचा उद्‌घोष सार्थ पद्धतीने घेतला जातो, त्या मांदियाळीत तेंडुलकर हे मानाचे नाव अग्रभागी राहिले. ते नाव केवळ मराठीतून भारतीय स्तरावर गेले असे नाही, तर ते जागतिक रंगभूमीच्या परिसरात आदराने घेतले गेले.

कलाक्षेत्रात एखादा माणूस एका रात्रीत मोठा झाला असे आपण कौतुकाने म्हणतो, ते वाच्यार्थाने खरे नसते ! त्यामागे त्या व्यक्तीची चिवट साधना, अपार कष्ट, अनेक अपमान-अवहेलना यांचे संचित असते. त्याच्या खडतर, अंधारमयी प्रवासाची कल्पना आपल्याला असतेच असे नाही. तेंडुलकरांनी जे भोगले, जे सोसले; त्याला पारावार नाही. एकाचवेळी समाजाने नाकारणे-धिक्कारणे आणि त्याच समाजाने त्यांना गौरविणे असा अपूर्व नाट्ययोग त्यांच्या संदर्भात घडला. असे नाकारणे आणि स्वीकारणे यातूनच त्यांचे व्यक्तित्त्व झळाळून निघाले. हे नाकारणे केवळ शब्दांपुरतेच असते तर ते आपण समजू शकतो. कारण तसे ते अनेकांच्या वाट्याला आलेले आहे. परंतु तेंडुल्करांनी शब्दांचा-शिव्यांचा मार तर खाल्लाच, शिवाय शब्दशः छडीचाही मार खाल्ला. अनेक पत्रे, दूरध्वनीद्वारा समाजाने त्यांना आणि त्यांच्या कुटुंबियांनाही संत्रस्त केले. अगदी आयुष्यातून उठून जावे

लागावे इतके ! असे सारे सोसून-भोगूनही तेंडुलकर कधी संतप्त झाले नाहीत. विजनवासी, संन्यस्त झाले नाहीत. ते शांतपणे जगत राहिले. मनातला कल्लोळ, दाह मनातच ठेवून लिहीत राहिले. त्यांच्या जीवनातली ही शांतता, सोशिकता कशातून आली असेल ? असा प्रश्न नेहमीच पडतो. त्यांनी कोणावर सूड उगवला नाही, कडवटपणा व्यक्त केला नाही. त्यामुळेच त्यांची प्रतिमा आणि प्रतिभा एका उंचीवर जाऊन पोहोचली.

तेंडुलकरांना खऱ्या अर्थाने भारतीय स्तरावर नाव मिळाले ते 'शांतता कोर्ट चालू आहे' या नाटकाने. त्याआधी त्यांनी 'श्रीमंत', 'गृहस्थ', 'माणूस नावाचे बेट', 'कावळ्यांची शाळा', 'मधल्या भिंती', अशी प्रायोगिक रंगभूमीसाठी नाटके लिहिली. विषय-आशयाच्या प्रयोगशीलतेने अनेकांचे लक्ष त्यांच्या नाट्यलेखनाकडे वळले. पण १९६७-६८ ला 'शांतता कोर्ट चालू आहे' आले; तेव्हा सारा माहोल पालटला. एक अस्सल नाट्यकृती म्हणून, तिचे कौतुक झाले. या नाटकाला 'कमलादेवी चटोपाध्याय पुरस्कार' लाभला. या नाटकाची भारतीय चौदा प्रमुख भाषांमध्ये भाषांतरे झाली आणि तेंडुलकर भारतीय रंगभूमीवर विराजमान झाले. या काळातले त्यांचे अस्तित्व आणि कर्तृत्व मला खूप जवळून पाहायला मिळाले. मी त्या काळात (१९६०-६८) 'रंगायन' या नाट्यसंस्थेचे पुण्यातले काम पाहात होतो. त्यामुळे तेंडुलकर, श्री. पु. भागवत, विजया मेहता, अरविंद-सुलभा देशपांडे, आदींच्या सतत भेटी व्हायच्या. नाटकाची संहिता, त्याचे वाचन, प्रयोगानंतरच्या चर्चा यांमध्ये मला सहभागी होता आले. एका अर्थाने त्या कालखंडाचे साक्षीपण मला लाभले. गेल्या शतकात पहिली दोन दशके जसे पहिले सुवर्णयुग मराठी रंगभूमीच्या संदर्भात घडले. तसेच आधुनिक काळात १९६० ते १९८५ हे दुसरे सुवर्णयुग मानावे लागेल. याच कालखंडात तेंडुलकरांची, महत्त्वाची नाटके रंगमंचावर आली. त्यामध्ये 'घाशीराम कोतवाल', 'गिधाडे', 'सखाराम बाइंडर', 'कमला', 'अशी पाखरे येती', 'कन्यादान', अशी महत्त्वाची नाटके आली. ती निरनिराळ्या कारणांनी गाजली, बहुचर्चित झाली. त्यामुळे तेंडुलकर वादग्रस्त आणि वादळग्रस्त ठरले ! त्या वादांमुळे 'घाशीराम' 'सखाराम' नाटकांवर उदंड चर्चा झाली. इतकी वादळी जाहीर चर्चा मराठीतल्या कोणत्याच नाटकावर झाली नाही. त्यावेळी 'घाशीराम कोतवाल' (१९७२) नाटकावर मुख्य आक्षेप होता तो इतिहासातील नाना फडणवीस यांच्या चारित्र्यहननाचा प्रयत्न केल्यावद्दल, आणि 'सखाराम बाइंडर' (१९७४) वर आक्षेप होता, या नाटकाने विवाहसंस्था धोक्यात येईल वगैरे. आता तीस-पस्तीस वर्षांनंतर या चर्चेची धूळ खाली बसली आहे. जे आक्षेप होते त्यातली तीव्रता कमी झाली. एकविसाव्या शतकातल्या नव्या पिढीला या वादांबद्दल सांगितले तर त्यांना आश्चर्ययुक्त हकिगत वाटेल अशी स्थिती आहे. एखाद्या नाटकाच्या लेखनाने अथवा प्रयोगाने समाजातील दीर्घकालीन परंपरा कधीही नष्ट होत नसते. ज्यावेळी 'सखाराम बाइंडर' नाटक रंगमंचावर आले तेव्हा या नाटकाने शेकडो वर्षांतील विवाहसंस्था धोक्यात येईल असा तेंडुलकरांवर आरोप ठेवला गेला. खटला भरला गेला आणि जेवढा म्हणून त्रास देणे शक्य आहे, तेवढा त्रास तेंडुलकरांना दिला गेला. शारीरिक, मानसिक, कौटुंबिक अशा सर्वच स्तरांवर तेंडुलकरांना सोसावे लागले. त्यांनी कोणत्याही प्रकारचा आक्रस्ताळेपणा न करता ते सारे सोसले. त्यांच्या या नाटकामुळे त्यावेळचे नाट्यपरिनिरीक्षण मंडळ (सेन्सॉर बोर्ड) रद्द केले गेले. नाटकाचा निर्माता, दिग्दर्शक कमलाकर सारंग आणि प्रमुख भूमिका करणारी त्याची पत्नी लालन सारंग या दोघांनी हा लढा मोठ्या प्रमाणात दिला. तो सारा संघर्षकाळ, त्यातल्या यातना, वेदना मी जवळून पाहिलेल्या होत्या.

ह्या साऱ्या संघर्षानंतर एखादा लेखक लिहिण्याचे थांबला असता, खचून गेला असता. सर्व जगाच्या प्रतिक्रियांचा राग, आपल्या लेखणीबंद पद्धतीने काढला असता, पण तसे घडले नाही. 'तें' लिहीत राहिले. 'कमला' नावाचे अगदी वेगळ्या प्रकारचे नाटक त्यांनी लिहिले. त्यात विक्रम गोखले, लालन सारंग, स्वतः कमलाकर सारंग आणि कमलाच्या भूमिकेत चारूशीला साबळे होती. एक लक्षणीय नाट्यलेखन आणि तितकीच सर्जनशील प्रयोगनिर्मिती असेच त्या नाटकाचे वर्णन करावे लागेल. १९८२-८३ च्या सुमारास वृत्तपत्रात एक बातमी आली होती, मध्यप्रदेशातल्या एका गावी स्त्रियांच्या विक्रीचा लिलावाचा बाजार भरतो. चार

ओळीच्या वृत्ताच्या आधाराने तेंडुलकरांनी मोठे नाटक उभे केले. ती बातमी निमित्त झाले. पण त्या निमित्ताने स्त्रीचे अस्तित्व, कुटुंबसंस्था, पत्रकारिता अशा अनेक विषयांवरचे तेंडुलकरांचे चिंतनशील मन व्यक्त झाले. या नाटकाच्या काळात काही कामानिमित्ताने मी कलकत्ता येथील जाधवपूर विद्यापीठात चर्चासत्रासाठी गेलो होतो. त्या चर्चेत एका प्राध्यापकाने मला विचारले, ''तुम्ही लोक तेंडुलकरांच्या नाट्यकृतींचा अन्वयार्थ कसा लावता? आमच्या दृष्टीने तेंडुलकर हे साम्यवादी विचारसरणीचे लेखक आहेत, आम्ही त्याच पद्धतीने त्यांच्या लेखनाकडे पाहतो...'' तो प्राध्यापक केवळ एवढे विधान करून थांबला नाही, तर त्याने 'घाशीराम', 'सखाराम', 'गिधाडे', 'कमला' ह्या चार नाटकांचा अन्वयार्थ साम्यवादी पद्धतीने पटवून दिला. मी ते ऐकून काहीसा चकित झालो. कारण आपण आत्तापर्यंत तेंडुलकरांच्या नाट्यकृतींकडे कलावादी दृष्टीनेच पाहिलेले आहे हे माझ्या ध्यानात आले. तेंडुलकरांच्या नाटकांकडे अशाही नजरेने पाहता येते, अभ्यासता येते. तेंडुलकरांच्या पद्धतीने सांगायचे तर ते म्हणाले असते, 'या विधानाने तुला एक नजर दिली !' योगायोग असा की, त्याच काळात तेंडुलकरही दुसऱ्या एका समारंभाच्या निमित्ताने कलकत्त्यात होते. ऋत्विक घटक यांच्या चित्रपटांवर बोलण्यासाठी आलेले होते. मला हे कळल्यावर मी त्यांची भेट घेतली. त्यांना सर्व वृत्तांत सांगितला. त्यांनी शांतपणाने साम्यवादी विचारसरणीचे कलावंत त्यांच्या नाटकांकडे कोणत्या रीतीने पाहतात ते सविस्तरपणाने सांगितले. कोणताही अभिनिवेश न आणता ! ते सारे ऐकून वाटत राहिले की, महाराष्ट्रात समाजवादी वृत्तीचे वाटणारे तेंडुलकर कलकत्ता परिसरात साम्यवादी वाटतात, यातले नेमके खरे काय समजायचे ? याचा अर्थ सरळ होता की त्यांच्या नाट्यलेखनात विविध अर्थ-अन्वय काढण्याची क्षमता सामावलेली आहे. कलाकृतीचे असे अनेकांगी अन्वयार्थ लागणे यातच तिचे मोठेपण असते !

नाटककाराच्या लेखनाची ताकद त्याच्या बहुअंकी नाटकात जाणवत असते, तशीच ती एकांकिका लेखनात विशेषत्वाने ध्यानात येते. तेंडुलकर त्याही लेखनप्रकारात अग्रभागी आहेत. त्यांच्या नाट्यलेखनाचा आरंभच एकांकिका लेखनाने झाला. अगदी अल्प किंवा सीमित वेळेत एकरसात्मक, एकपरिणामात्मक, एकजीवी स्वरूपाचे लेखन करणे हे अनेक अर्थाने आव्हानात्मक आणि आवाहनात्मकही असते. ते आव्हान त्यांनी स्वीकारून एकांकिका लेखन केले. ते लेखन किती कसदार, परिपूर्ण झाले याचा प्रत्यय 'मादी', 'अजगर आणि गंधर्व', 'काळोख', 'ओळख', 'रात्र', 'काही खरं नव्हे !' 'भेकड' अशा अनेक एकांकिकांमधून येत गेला. या लेखनाचे साहित्यमूल्य, प्रयोगमूल्य उत्तम आहे यात शंकाच नाही, पण त्याहीपेक्षा या लेखनाने पुढच्या अनेक लेखकपिढ्यांना 'वस्तुपाठ' मिळाला ! याही गोष्टीला आता पाच दशकांहून अधिक काळ लोटला. १९५१ च्या सुमारास मुंबईतल्या भारतीय विद्या भवन संस्थेने पहिली एकांकिका स्पर्धा आयोजित केलेली होती. तेव्हा महाविद्यालयीन स्तरावर वावरणाऱ्या आणि नाट्यक्षेत्रात काही करू इच्छिणाऱ्या होतकरू मंडळींमध्ये दामू केंकरे, विजया जयवंत (मेहता), अरविंद देशपांडे, कमलाकर सारंग आदी अनेक मंडळी होती. त्यांना नव्या जीवनजाणिवेने लिहिणारा लेखक हवा होता, तो तेंडुलकरांच्या निमित्ताने मिळाला. प्रयोगजीवी कलांच्या क्षेत्रात असा समसमा संयोग असावाच लागतो. कलावंत आणि सर्जनशील लेखक यांचा सुमेळ साधला गेला की, त्यातून ते क्षेत्र किती बहरते, विकसित होते याचा अनुभव त्या काळात येत गेला. तिथेच तेंडुलकरांच्या लेखणीचा अंदाज मराठी प्रेक्षकाला यायला आरंभ झाला. काही काळ तेंडुलकरांनी नभोनाट्येही लिहिली. त्यांच्या लेखनातील शब्द-रचनेची ताकद काय आहे ते समजत गेले. त्यातूनच त्यांनी 'गृहस्थ', 'श्रीमंत' ह्या पहिल्या काळातील मोठ्या नाटकांचे लेखन केले. तिथे लेखनातली बंडखोरी मर्यादित अर्थाने होती, पण परंपरेपेक्षा विषयाचे-आशयाचे वळण भिन्न दिशेकडे जाणारे आहे, याचा अंदाज येत होता.

लहान मुलांसाठीही तेंडुलकरांनी तितक्याच सर्जनशील रीतीने लेखन केलेले आहे. 'पाटलाच्या पोरीचं लगीन', 'चांभार चौकशीचे नाटक', 'राजाराणीला घाम हवा', 'बाबा हरवले आहेत' अशी उत्तम दर्जाची बालनाटके वाचल्यानंतर मुलांना कोणत्या प्रकारचे नाटक हवे असते याचा तेंडुलकरांना अंदाज कसा होता, हे ध्यानी येते.

मुलांचा वयोगट, त्यांची मानसिकता, त्यांचे भावविश्व आणि रंगभूमी माध्यमाची ताकद ह्या साऱ्याच घटकांचा आवाका, त्याचे भान त्यांना होते. लेखनातली अशी प्रगल्भता फार थोड्या लेखकांकडे असते. तेंडुलकरांची ही बालनाटके पाहताना वाटत होते, की त्यांनी मोठ्या नाटकाबरोबर छोट्यांसाठीही लिहीत राहावे; परंतु नंतरच्या काळात तसे घडले नाही याचे वाईट वाटते. वेगळ्या अर्थाने असे म्हणता येईल की, ज्या नवीन नाट्यलेखकांना उत्तम प्रकारचे बालनाट्य लिहायचे असेल त्यांना तेंडुलकरांच्या लेखनाचा नमुना म्हणून वापर करता येईल. कारण पु. ल. देशपांडे, सई परांजपे, रत्नाकर मतकरी अशा दुर्मिळ मांदियाळीत विजय तेंडुलकर हे नाव अग्रभागी राहणारे आहे !

तेंडुलकरांच्या एकूणच लेखनातील ताकद त्यांच्या मिताक्षरी किंवा अल्पाक्षरी पद्धतीत आहे. विरामचिन्हांचा (स्वल्पविराम, अर्धविराम, उद्‌गार, प्रश्नात्मक वगैरे) वापर करून, कमीत कमी शब्दांचा, टिंबांचा, रेषांचा आधार घेऊन तेंडुलकर लिहीत असत. त्या आधारे त्यांची रंगावृत्ती तयार होत असे. त्यामध्ये त्यांनी लिहिलेल्या रंगसूचना (स्टेज डिरेक्शन) हा स्वतंत्र अभ्यासाचा विषय ठरेल इतका मौलिक आहे. कारण त्याच रंगसूचना लेखकाला रंगभूमी माध्यमाचे भान आणि ज्ञान किती आहे ते कळत जाते. त्यांच्या नाट्यलेखनाची श्रेणी ठरवीत जाते. स्थळ, काळ आणि कृती यांचा मेळ कलाकृतीत आहे किंवा नाही ते जोखता येते. त्याबाबत तेंडुलकर श्रेष्ठ आहेत, हे निर्विवाद !

एकांकिका, नाटके, कथा, कादंबऱ्या, स्तंभलेखन, स्फुटलेखन, पत्रकारिता, पटकथाकार अशा अनेक अंगांनी तेंडुलकर व्यक्त होत गेले. एक विचारवंत, समाजप्रश्नावर सक्रिय भूमिका घेऊन भाष्य करणारे अशीही त्यांची प्रतिमा होती. तरीही प्रामुख्याने ते नाटककार म्हणूनच सर्वांसमोर प्रतीत झाले. त्यांची नाट्यलेखन कामगिरी रंगभूमी क्षेत्रात 'अक्षय' ठरली ! कारण त्यांची नाटके म्हणजे केवळ धटकाभर मनोरंजन किंवा कल्पनांचे खेळ नव्हते. समाजातील प्रखर वास्तवाचे दर्शन घडविण्याची त्यात ताकद होती. त्यातली प्रखरता, भेदकता अनेक प्रश्न निर्माण करणारी ठरली. त्यामुळेच केवळ महाराष्ट्रापुरते तेंडुलकरांचे महत्त्व राहिले नाही ते भारतीय आणि एकूणच जागतिक स्तरांवर लक्षवेधी झाले. मराठी नाटक-रंगभूमीच्या क्षेत्रात हे प्रथमच घडले. त्यांच्या नाटकांचे प्रयोग परदेशात ज्या संख्येने झाले तोही एक विक्रमच म्हणावा लागेल.

तेंडुलकर व्यक्ती आणि लेखक अशा दोन्ही स्तरांवर त्यांना पाहण्याचा-अनुभवण्याचा भाग्ययोग मला आला. काही प्रमाणात पत्रव्यवहारही झाला. प्रत्यक्ष भेटींच्या बरोबरीने जाहीर मुलाखती, त्यांच्याविषयीचे लेखन करता आले. हा सारा प्रयत्न गेली पन्नास वर्षे अखंडितपणे चालू आहे, तरीही ध्यानात येते आहे की, विजय तेंडुलकर एक व्यक्ती म्हणून, लेखक म्हणून आपल्याला पूर्णतः आकलन झालेले नाहीत. ते समजून घेणे ही एक व्यामिश्र अशी प्रक्रिया आहे. ती निरनिराळ्या संदर्भात उलगडत जाईल. कोणताही सर्जनशील, द्रष्टा लेखक आकळून घ्यायचा म्हणजे या पद्धतीने जाणे भाग असते. त्यातच त्या लेखकाचे सामर्थ्य सामावलेले असते. तेंडुलकर तसे होते यात शंकाच नाही !

❖❖❖

**डॉ. वि. भा. देशपांडे**
अकल्पित, पटवर्धन बाग, एरंडवन,
पुणे ४११ ००४.

### विजय तेंडुलकर यांचे नाट्यलेखन

१) गृहस्थ
२) श्रीमंत
३) माणूस नावाचे बेट
४) मधल्या भिंती
५) कावळ्यांची शाळा
६) चिमणीचं घर होतं मेणाचं
७) मित्राची गोष्ट
८) भाऊ मुरारराव
९) दंबद्वीपाचा मुकाबला
१०) पाहिजे जातीचे
११) लोभ नसावा ही विनंती
१२) फुटपायरीचा सम्राट
१३) कुत्रे
१४) बेबी
१५) भल्याकाका
१६) झाला अनंत हनुमंत
१७) चिरंजीव सौभाग्यकांक्षिणी
१८) विठ्ठला !
१९) एक हट्टी मुलगी
२०) मी जिंकलो, मी हरलो !
२१) कमला
२२) घाशीराम कोतवाल
२३) अशी पाखरे येती
२४) शांतता कोर्ट चालू आहे
२५) सखाराम बाइंडर
२६) सफर
२७) नियतीच्या बैलाला हो !
२८) कन्यादान
२९) गिधाडे
३०) सरी ग सरी
३१) समग्र एकांकिका भाग - १
३२) समग्र एकांकिका भाग - २
३३) समग्र एकांकिका भाग - ३



अनुक्रमणिका

□

# महाराष्ट्राची जाणती 'अक्का' : मूर्तिमंत लोकसंस्कृती !

□

डॉ. अनिल सहस्रबुद्धे



महाराष्ट्राची अक्का गेली ! 'अक्का' केव्हढा व्यापक आणि सात्त्विक 'लोकबंध' कर्नाटक आणि महाराष्ट्राच्या सीमा पुसून टाकणारा ! अक्कांनी सार्थपणे हा लोकबंध सांभाळला, दृढ केला ! 'अक्का' म्हणजे ज्येष्ठ भगिनी, भारतीय परंपरेत मानलेली नातीही सख्या नात्यांसारखी पावित्र्याने आणि श्रद्धेने जपली जातात. मिरज, सांगली, कोल्हापूर, सातारा परिसरातली अक्का पुण्यात राहिली आणि 'लोकसाहित्य समिती महाराष्ट्र राज्य'चे अध्यक्षपद भूषविताना 'महाराष्ट्राची अक्का' झाली. केव्हढं थोरलेपण! गावागावातल्या बंधुराजांच्या घराघरात अक्कांचा तालेवारपणा चालायचा. तेवढ्याच प्रेमानं त्यांची प्रत्येक भावजय भावाला साथ देत अक्कांचा तालेवारपणा सांभाळायची. 'अक्का'ही झोकात 'दिवाणसाब' म्हणून हुकूमत गाजवायच्या. त्या हुकमतीत प्रेमाची जरब असायची आणि मायेची शिस्तही असायची.

अक्काच्या भूमिकेतून महाराष्ट्रात आणि महाराष्ट्राच्या सीमावर्ती भागात अक्कांची जोडलेली भावंडे असंख्य. त्यांच्या सहाय्यानं अक्कांनी मराठी लोकसाहित्याचा प्रपंच मांडला. 'लोकसाहित्या'ची सजीव लेणी अक्कांनी लोकसाहित्य समितीच्या आणि 'समाज शिक्षण माले'च्या माध्यमातून वज्रलिपित केली. लोकसाहित्याला रेडिओ, टी.व्ही. आणि सभासंमेलनाची, नाटक, सिनेमांची, दारं अक्षरशः खुली केली. लोकसंस्कृतीच्या उपासकांना आपल्या पारंपारिक व्यवसायात्मक श्रद्धानाट्यांना 'जनलोकांचा सामवेद' एव्हढे स्थान प्राप्त करून दिले. भारतीय संस्कृतीचे भाष्यकार पू. सानेगुरूजी आणि पिताश्री कृ. बा. बाबर गुरुजी यांचा वारसा जपणाऱ्या या महाराष्ट्राच्या ज्येष्ठ लेकीने 'छंद माझा वेगळा' असे सांगत 'लोकछंदाची' आळवणी केली.

बाबरांची कन्या मूळातच चुणचुणीत, हुषार, तेव्हढीच कठोर शिस्तीची आणि कमालीची मायाळू. या मुलीने स्वातंत्र्यचळवळीत उडी घेतली. स्वाभाविकपणे स्वातंत्र्योत्तर काळात, राजकीय क्षेत्राने या धाडसी आणि अस्मितापूर्ण मुलीला आपल्याकडे खुणावले. सर्वथरावर समर्थपणे नेतृत्व पेलण्याची ताकद होती. पं. जवाहरलाल नेहरू, यशवंतराव चव्हाण, वसंतदादा पाटील, इंदिरा गांधी आदि राष्ट्रीय नेत्यांशी अत्यंत जिव्हाळ्याचे संबंध असतानाही अक्का लोकसंस्कृतीच्या उपासक बनल्या. 'लोकसंस्कृती' आणि 'लोकशिक्षण' ही महत्त्वाची क्षेत्रे त्यांनी आपल्या कार्यकर्तृत्वासाठी निवडली. महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यात, शेतीप्रधान समाजासाठी 'समाज शिक्षण माला' चालविली. 'मालेची' पाचशेवर पुस्तके दरमहा एक या प्रमाणे प्रसिद्ध करून समाजाला शहाणे करण्याची तपश्चर्या केली, अक्कांची भूमिका अशा तऱ्हेने पार पाडताना 'लोकसंस्कृतीचे प्रकटीकरण' म्हणजे लोकसाहित्य' हा आपल्या अभ्यास छंदाचा विषय बनविला. 'मराठीतील स्त्रीधन' हा प्रबंध यांच्या या अभ्यासछंद दिशेची साक्ष देतो. 'कमळाचं जाळं', 'हिरवा चुडा', 'आठवतंय तेवढं सांगते' या सारख्या स्त्रीजीवनाची हळुवार उकल घडविणाऱ्या वैशिष्ठ्यपूर्ण कादंबऱ्या. 'चिंचेची-पत्रावळ', 'सुंबरान मांडीलं', 'राही रुक्मिणी', 'डोंगरची मैना', असे ग्रामीण जीवनातील समृद्ध संस्कृतीचे पदर उलगडणारे अनेक कथा



अनुक्रमणिका

संग्रह. 'झोळणा' सारखे काव्य असे त्यांचे साहित्य लोकसंस्कृतीच्या उपासनेची आणि सिद्धहस्त लेखणीची साक्ष देतात. 'लोकसाहित्य समिती महाराष्ट्र राज्य'च्या अध्यक्षपदावरून लोकसाहित्यांचे संकलन, संपादन करून त्यावर; संस्कृतीदर्शनात्मक आणि मानवी भावभावनांचे, जीवनसरणीचे व्यामिश्रपणे गुंफलेले गरीवश्रीमंत धागे उलगडत केलेले गहिवर दाटले भाष्य; रसिक, अभ्यासक, संशोधक यांना लोकसाहित्याच्या अभ्यासाकडे खेचून नेणारे ठरले ! दूरदर्शनवर झालेल्या 'रानजाई' या मालिकेने तर महाराष्ट्र संस्कृतीचे देखणेपण अधिक लडिवाळ आणि देखणं करून लोकांसमोर मांडून; हरवू पाहणाऱ्या सांस्कृतिक अस्मितेचे पुनरूज्जीवन केले. विद्यापीठाच्या डॉक्टरेट आणि डी.लिट्. सारख्या पदव्या उत्स्फूर्तपणे दिंड्या घेऊन अक्कांकडे आल्या. अक्कांच्या कार्यकर्तृत्वाने त्या औपचारिक डिग्र्या शोभिवंत झाल्या !

लोकसाहित्याच्या अभ्यासाचा वढेजाव आजकाल वाढला. विज्ञान, तंत्रज्ञान, मानव्यशास्त्रे, भाषाशास्त्र अशा सर्वच शास्त्रांच्या मूलभूत अभ्यासाकरिता; लोकसाहित्य सर्वतोपरी, प्राथमिक, आवश्यक सामग्री 'लोक'च्या मौखिक, वर्तन आणि वस्तू किंवा साधन परंपरांमधून पुरविते; हे आता सर्व अभ्यासकांना, तज्ज्ञांना मान्य झाले आहे. विशेषतः पाश्चात्य देशांमध्ये कोणत्याही ज्ञानशाखेमध्ये अभ्यास करताना, 'फोक लोअर' मध्ये कोणती माहिती उपलब्ध आहे; ते पाहिले जाते. लोक संज्ञापन प्रक्रियेमध्ये तर लोकसाहित्याशिवाय पान हालत नाही. या गोष्टींचा विचार करता; लोकसाहित्याच्या पद्धतशीर अभ्यासाला सुरूवात झाली. लोकसाहित्याच्या अभ्यासाचे अनेक संप्रदाय निर्माण झाले. लोकसाहित्याची व्याप्ती 'लोक'च्या व्याप्ती एवढी व्यापक आहे; हेही लक्षात आले. 'लोक' म्हणजे अवघी मानव जात एवढा व्यापक अर्थ 'लोक' या शब्दाला प्राप्त झाला. विज्ञान, तंत्रज्ञान मानवी जीवनाला सतत विकसित साधनसामग्री पुरवीत राहते तरी; मानवी जीवन व्यवहार कल्पना, भावना आणि विचार यांच्या आधारावरच प्रवाहीपणे कालक्रमण करीत असते, त्यामुळे; लोकसंस्कृती, लोकमानस, लोकसाहित्य हे नित्य वर्तमान असते. नवे पर्याय, परिवर्तने ते अशा बेमालूमपणे स्वीकारते की बदल केव्हा, कसा झाला हे कळतही नाही. त्यामुळे लोकजीवनाचे प्रकटीकरण ज्या ज्या तऱ्हेने होते. त्याचे नमुने अर्थात लोकसाहित्य सतत संकलित करीत राहावे लागते. लोकसाहित्य संकलन, संपादन ही एक प्रक्रिया आहे. म्हणूनच लोकसाहित्य संकलनासाठी सतत संकलकांची फळी तयार ठेवावी लागते. इतिहासपुराणे, वर्तमान आणि भविष्यवेध यांचे नेटके वास्तव आणि मानवी भावजीवनासह आकलन व्हायचे असेल तर ही प्रक्रिया आवश्यक आहे. जागतिक पातळीवरील अभ्यासकांनी हे लक्षात घेतले. लोकसाहित्याचा अभ्यास हा मानवी जीवनाभ्यासाचा पाया आहे; हे महाराष्ट्रात ज्या अभ्यासकांनी ओळखले, कामाला सुरूवात केली, त्यात डॉ. सरोजिनी बाबर, डॉ. दुर्गा भागवत, साने गुरूजी प्रभृती यांचे महत्त्व अनन्य साधारण आहे. भारतात आणि पर्यायाने महाराष्ट्रात लोकसाहित्याच्या पद्धतशीर अभ्यासाला खूप उशिरा सुरूवात झाली हे खरे पण, साने गुरूजी आणि त्यांच्या या दोन्ही, एक प्रकारे शिष्याच; यांनी लोकसाहित्याच्या अभ्यासाची— पायाभरणी केली. ही गोष्ट ऐतिहासिक महत्त्वाची आहे. 'लोकसाहित्य ही प्रयोगसिद्ध वाङ्मयकला आहे (परफॉर्मिंग आर्ट)', 'लोकसाहित्य म्हणजे जगण्याची आपसुक (परंपराप्राप्त) विद्या', असे म्हटले जाते. म्हणजे आपण 'जगतो ते लोकसाहित्यात' हे लक्षात घेतले; तर अक्का मूर्तिमंत लोकसाहित्य होत्या असे म्हणणे अतिशयोक्त होणार नाही. म्हणूनच त्यांनी लोकजीवनात, एक भूमिका स्वीकारली 'अक्का' म्हणून ! या भूमिकेतून प्रयोगसिद्ध वाङ्मयकलेचे संकलन सुरू केले. संपादनपूर्वक ते साहित्य; एका वाजूने सांस्कृतिक ठेवा म्हणून आणि दुसऱ्या बाजूने अभ्यासकांना अभ्यासाची सामग्री म्हणून; ग्रंथरूपात प्रसिद्ध केले.

'साजशिणगार', 'एक होता राजा', 'जनलोकांचा सामवेद', 'छंद माझा वेगळा', 'आदिवासींचे सणोत्सव', 'सणोत्सव', 'बाळराजा', 'जा माझ्या माहेरा' 'कुलदैवत', 'कारागिरी', अशी त्यांची संपादित पुस्तके अर्थात 'लोकसाहित्य समिती महाराष्ट्र राज्य' ची प्रकाशन पुष्पे पाहिली; तर अक्कांनी किती भावंडांना लोकसाहित्य संकलनाचा छंद जडवला होता हे पाहून माणूस थक्क होतो. माणूस उलगडण्यासाठी माणसांना जोडण्याचा छंद अक्कांना होता. माणूस लोकसाहित्यातून अगदी थेट

मातृकोशात उलगडला, जावा तसा उलगडत जातो, हे
ाक्कांनी अचूक लक्षात घेतले होते. त्यांचे संपादन-भाष्य,
ाके खेळकर की शेजीबाईशी, जीवलग सख्याशी,
ावर जमलेल्या मंडळींशी त्या गप्पा वाटाव्यात.
ाकसाहित्यातली मौखिक परंपरा जी मानवी जीवनाला
ाडी भरून वाहात संपन्न करणाऱ्या गंगेसारखी असते
ावा अनुभव यावा.

लोकसाहित्याच्या अभ्यासक्षेत्रात कामगार महिलेपासून
ध्यापकांपर्यंत सर्वांना सहभागी करून घेत; भलरी गात
ा निखरणी करावी तशी अभ्यासाची परंपरा अक्कांनी
र्माण केली. याची असंख्य उदाहरणे या संपादित
ांमध्ये पाहावयास मिळतील. अगदी वैयक्तिक अनुभव
ायचा तर 'एक होता राजा' या डॉ. सरोजिनी बाबर
ादित ग्रंथाच्या आधारे मी बी.एड्.ला असताना
ेला प्रकल्प प्रयोग, त्यांना सहज म्हणून दाखवला
ाणि त्यांनी अशी काही हळुवार दीक्षा मला दिली; की
आदिवासींमध्ये पायी भ्रमंती करून क्षेत्रीय
ायासपूर्वक 'चाळीसगाव डांगाण परिसर : सांस्कृतिक,
ाङ्मयीन आणि भाषिक 'अभ्यास' असा लोकसाहित्य
ाोधनप्रबंध पुणे विद्यापीठाकडे सादर केला. हा प्रबंध
दर करताना मी त्यांना संकलित गीतांचे, लोककथांचे,
ाद नमुन्यांचे बाड दाखविले. त्यावरील भाष्य वाचून
खविले, त्यांनी या प्रबंध लेखनावर संस्करण करवून
घेतले. यथावकाश मी पीएच.डी.झालो. आदिवासींमध्ये
सेवा कार्य करू लागलो, त्यातही त्यांनी माझी पाठराखण
केली. हे करीत असताना लोकसाहित्य संकलन, संपादन
आणि चिकित्सा या गोष्टी करिता माझ्यामागे त्यांचा सतत
लकडा असे. माझी 'डांगाणी' ही महादेव कोळ्यांच्या
डांगाणी बोलीत लिहिलेली कादंबरी वाचून अक्कांनी मला
डोक्यावर घेतले. मा. ना. वसंतदादा पाटील यांच्या
शुभहस्ते त्या कादंबरीचे प्रकाशन घडविले. त्या, माझ्या
घरी, अकोल्याला आल्या. वनवासी कल्याण आश्रमात
राहून आदिवासी विद्यार्थ्यांत रमल्या. त्यांच्या गावी,
वागणीला त्या मला घेऊन गेल्या. या प्रवासात
लोकसाहित्य संकलन, संपादन, भाष्य किंवा चिकित्सा,
लोकसाहित्याचे महत्त्व त्यांनी मला परोपरीने सांगितले.
लोकसाहित्य जगताना तद्रुपता प्राप्त होते हे त्यांच्या
वागण्या बोलण्यातून, लक्षात आले. अक्कांचा आवाज
मधुर होता. थेट जात्यावर जाऊन बसायच्या सखीबाई
बरोबर ! आपल्या गोड गळ्याने सखीबाई बरोबरच
अवतीभोवतीच्या लोकांनाही थक्क करून टाकायच्या.
आज मी लोकसाहित्याचा अभ्यासक, संशोधक म्हणून
कार्यरत आहे ते अक्कांमुळे ! त्यांच्या संपादित ग्रंथांपैकी
जवळपास दहा ग्रंथात माझ्या अभ्यास समाविष्ट केलेला
आहे. हा अक्कांचाच आशीर्वाद !

अक्का गेल्यामुळे पोकळी निर्माण झाली; असे मी
म्हणणार नाही; कारण असंख्य लोकसाहित्य विशारदांची
एक मोठी परंपरा त्यांनी उभी केली आहे. गेली दहा-बारा
वर्षे त्या विकलांग होऊन पडल्या होत्या; पण त्याही
अवस्थेची मानसिक स्थिती, दर्शनासाठी आलेल्या
लोकसाहित्याच्या अभ्यासकांसाठी प्रेरकच होती. त्यांच्या
कडून प्रेरणा घेऊन असंख्य अभ्यासक या क्षेत्रात अभ्यास
करीत आहेत. मात्र अभ्यासकांच्या मनात अभ्यास करताना
पाठीवर थाप देणारी 'अक्का' आता नाही याची खंत
वाटणारच आहे. महाराष्ट्राची जाणती अक्का, मूर्तिमंत
लोकसंस्कृती, ग्रंथसंपदेच्या रूपाने अक्षर राहिली आहे,
राहणार आहे. लोकसंस्कृतीचे, साहित्याचे उपासक म्हणून
अभ्यासकांनी सेवारत राहाणेच 'अक्कांना' आवडेल !

❖❖❖

**प्राचार्य डॉ. अनिल सहस्रबुद्धे**
'आई' पाईपलाइन रस्ता, अहमदनगर

# माणसाचा महिमा गाणारे–बाबूराव बागूल



गंगाधर अहिरे

भारतीय समाजव्यवस्थेचा पाया विषमतेवर आधारलेला आहे. या समाजरचनेत माणसाचे मूल्यमापन गुणकर्माऐवजी जाती आणि लिंगभेदावर केले जाते. येथील धर्मशास्त्रांनी हेतूपुरस्सर ही विषमता सामाजिक, आर्थिक व सांस्कृतिक क्षेत्रात टिकविण्यात आजवर महत्त्वपूर्ण भूमिका बजावली आहे. वर्णाश्रम पद्धतीने शूद्र, अतिशूद्र अशी उच्च-नीचता निर्माण करून येथील माणसा-माणसांत भेद निर्माण केला आहे. तो अधिकाधिक घट्ट करण्यासाठी जातींची उतरंड निर्माण केली आहे. या व्यवस्थेच्या ठेकेदारांनी माणूस म्हणून जगण्याचे सर्व अधिकार स्वतःकडे अबाधित ठेवून, स्वान्त सुखासाठी शूद्र-अतिशूद्रांवर गुलामगिरीचं जीणं लादलं. या विषमतावादी व्यवस्थेविरूद्ध सक्षम बंड करणारी परंपरा बुद्धापासून सुरू झाली. याच परंपरेतील फुले-आंबेडकरांनी या व्यवस्थेविरूद्ध तहहयात संघर्ष केला. फुले यांच्या वैचारिक आणि कृतिशील पर्वाचा वारसा डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी पुढे समर्थपणे चालविला. त्यांनी मानव मुक्तीसाठी विविध आघाड्यांवर लोकलढे उभारले. त्यांच्या समग्र लढ्याचा केंद्रबिंदू होता–'माणूस' या माणसाला समता, स्वातंत्र्य, बंधुता, न्याय, शिक्षण, सामाजिक प्रतिष्ठा मिळावी, हे त्यांच्या संघर्षमय जीवनाचे उद्दिष्ट होते. या उद्दिष्टाप्रत पोहोचण्यासाठी त्यांनी महाडचा सत्याग्रह, मनुस्मृतीचे दहन, काळाराम मंदिर प्रवेश सत्याग्रह, भारतीय राज्यघटना आणि १९५६ मध्ये केलेले धर्मांतर या सर्वच क्रांतिकारी घटनांनी येथील सनातन सामाजिक, सांस्कृतिक, धार्मिक तटबंदीला धडका दिल्या. ही व्यवस्थेची तटबंदी खिळखिळी झाली; पण जमीनदोस्त झाली नाही. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या नंतर त्यांच्या कृतिशील तत्त्वज्ञानातून अनेक लोकनेते, कार्यकर्ते, विचारवंत, लेखक, कलावंत निर्माण झाले. आपापल्या वकूबाप्रमाणे बाबासाहेबांचे अधुरे कार्य पूर्ण करण्यासाठी कार्यरत राहिले. क्रांतिकारक लेखक बाबूराव बागूल त्याच परंपरेतील एक महत्त्वाचे नाव आहे. बाबूराव बागूल यांचा जन्म १७ जुलै १९३० ला नाशिक परिसरातील विहितगाव येथे झाला. रोजगाराच्या निमित्ताने त्यांचे कुटुंब मुंबईला स्थलांतरित झाल्याने साहजिकच बागूल यांची जडणघडण ते राहत असलेल्या माटुंगा लेबर कॅम्प या बकाल वस्तीत झाली. कळत्या वयात मुंबई महानगरातील जातीय आणि वर्गीय विषमतेने त्यांच्या जगण्याचे संदर्भ बदलून टाकले. उपजतच प्रतिभावंत असलेल्या बाबूराव बागूल यांनी समाजातील सनातन रूढी परंपरा, भांडवलदार वर्गाकडून कामगारांची होणारी पिळवणूक, बेरोजगारीमुळे पोटाची खळगी भरण्यासाठी होणारी केविलवाणी लुटालूट, लेकराच्या दुधासाठी इच्छेविरूद्ध करावी लागणारी देहविक्री, अशा अनेकविध प्रसंगांचा, आजुबाजूच्या वास्तवाचा त्यांच्या संवेदनशील मनावर खोलवर परिणाम झाला. या मानसिक अस्वस्थतेतूनच त्यांच्या लेखनाला प्रारंभ झाला. या लेखनाचे अर्थातच वैचारिक अधिष्ठान होते बुद्ध, मार्क्स, फुले आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर.

बाबूराव बागूल यांचा पहिला कथासंग्रह 'जेव्हा मी

जात चोरली' (१९६३) ह्या १९६३ मध्ये प्रकाशित झाला. तो त्यांनी कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांना अर्पण केलेला आहे. या संग्रहातील कथांनी मराठीतील पारंपरिक लिखाणाच्या चौकटी मोडून तोडून टाकीत, मराठी कथेचा चेहरामोहराच बदलून टाकला. या कथासंग्रहाची जन्मकथा सांगताना बाबूराव बागूल म्हणतात, "येथे मी जन्म घेतला म्हणूनच मला जात मिळाली; पण जेव्हा मी लिहू लागलो, तेव्हा मी देशातल्या आणि जगातल्या सर्व दलित, उपेक्षित-वंचितांचा झालो; आणि म्हणून मी त्यांचे दुःख, वेदना, त्यांचे संघर्षमय जीवन माझ्या कथेत लिहिले." त्यांच्या कथेची प्रेरणा आणि प्रवृत्ती ही सामाजिक विषमतेला केंद्र करणारी आहे. त्यामुळे जातीतून वाट्याला येणारे दुःख हा बागूल यांच्या कथेचा मुख्य गाभा आहे. या कथासंग्रहात नोकरीसाठी आणि पोटासाठी नायकाला स्वतःची जात चोरून ठेवावी लागते. कथेच्या शेवटी नायक म्हणतो. 'मनूने मला मारले.' आणि नंतर हा नायक जागृत होतो. एका अर्थाने जागृत झालेला किंवा अस्मिता जागी झालेला समाज हा त्यांच्या कथेचा नायक आहे. त्यामुळेच अपरिहार्यपणे बंडखोरी, विद्रोह, नकार ही त्यांच्या कथेची वैशिष्ट्ये ठरतात. डॉ. आंबेडकरांचा शिका, संघटित व्हा आणि संघर्ष करा. हे तत्त्वज्ञान यातील नायकाच्या निमित्ताने बाबूराव बागूल यांनी प्रसृत केलेले आहे.

बाबूराव बागूल यांचा दुसरा कथासंग्रह १९६९ मध्ये प्रसिद्ध झाला. या कथासंग्रहातील विद्रोह, कवितेचा जन्म. मरण स्वस्त होत आहे आदि कथांमध्ये झोपडपट्टीतील दारिद्र्य, बुवाबाजी, बकाल जीवन, बेवारस माणसे, या माणसांचे हिरावून घेण्यात आलेले माणूसपण चित्रित करण्यात आलेले आहे. ही माणसे केवळ दुःखी, कष्टी नाहीत तर दुःखाचा डोंगर झेलणारी, भुकेनं त्रस्त झालेली, दारिद्र्याच्या विळख्यात अडकलेली, तरीही संघर्षमय जीवन जगणारी, परिस्थितीला शरण न जाणारी अशी लढवय्यी माणसे बागूल यांनी आपल्या कथेतून रेखाटली आहेत. त्यांच्या कथांमधून मुंबईतील झोपडपट्टी, गलिच्छ वस्ती, तिथे चालणारे स्त्री-पुरुषांचे अनेक अनैतिक चाळे, उघडी-वोडकी रोगीष्ट माणसे, अश्लील शिव्या देणारी माणसे, त्यांचे दैनंदिन चालणारे नैतिक-अनैतिक व्यवहार, हे सारंच अंगावर येणारं; पण वास्तवात असलेलं चित्रण बागूल त्यांच्या समर्थ लेखनशैलीतून मांडतात.

या कथासंग्रहाच्या निमित्ताने डॉ. आंबेडकरांना अभिप्रेत असलेल्या नव्या समाजरचनेचे स्वप्न बाबूराव बागूल पाहताना दिसतात. या संग्रहात 'कवितेचा जन्म' या कथेत सर्व दलित, शोषित, पीडित, सनातनी समाजव्यवस्थेच्या कैदेतून मुक्त झालेले आहेत. त्यांना समता, स्वातंत्र्य, न्याय, सामाजिक प्रतिष्ठा मिळाली आहे. असे डोळे उघडे ठेवून पाहिलेले स्वप्न त्यांनी कथेत रेखाटले आहे. बागूल यांच्यासारख्या माणसावर, त्यांच्या कर्तृत्वावर प्रचंड प्रेम करणारा माणूसच असा आशावादी असू शकतो.

बाबूराव बागूल यांच्या दोन्हीही कथासंग्रहांतून येणारी रूढी-परंपरा, धर्म या सर्वांना नाकारून विद्रोहाचे भयानक रूप दाखविणारी त्यांची कथा दलित साहित्यातीलच नव्हे, तर मराठी साहित्यातीलही सामर्थ्यशील टप्पा ठरलेला आहे. त्यांच्या कथेच्या स्वरूपाबद्दल शिरीष पै यांनी नेमके वर्णन केलेले आहे. त्या म्हणतात, की "बाबूराव बागूल यांची कथा ही मला एखाद्या चौकटीत न मावणाऱ्या आक्रमक चित्राप्रमाणे वाटते. ढग भरून आलेले असावेत, वारा मोकाट धावत सुटलेला असावा, जंगलातली झाडे खवळून-पिसाळून हादरत असावीत, धूळ-पाचोळ्याने वातावरण गदगदून व कोंदादून गेले असावे, सृष्टीच्या काळजातले वादळ कोणत्या क्षणी स्फोट होऊन उधळत बाहेर पडेल, हेही सांगता न यावे आणि अशा रौद्र रूपाचे चित्र एखाद्या व्याकूळ, बेचैन, अस्वस्थ आणि संतप्त चित्रकाराने काळ्या, जांभळ्या, तपकिरी, करड्या रंगातून बेभानपणे रंगवावे. ते चित्र कसे दिसेल ? असे चित्र कुठल्याही चौकटीत अडकून राहावयास तयार होईल काय ? बागूल यांना जे सांगावयाचे असते, ते भीषण, तिरस्करणीय, भयावह असते. अशी त्यांची कथा आहे." (संदर्भ-शिरीष पै, ओळख, जेव्हा मी जात चोरली होती. - अभिनव प्रकाशन)

बाबूराव बागूल यांनी कथांबरोबर सूड, अघोरी, कोंडी या कादंबऱ्या आणि आंबेडकर भारत (खंड-१), आंबेडकर भारत (खंड-२), दलित साहित्य आजचे

क्रांती विज्ञान हे वैचारिक ग्रंथही लिहिले आहेत. त्यांचे साहित्य हे कलावादी अथवा रंजनासाठी नसून, त्यांच्या लिखाणाला तात्त्विक बैठक आहे. केवळ लेखकबुवा न राहता त्यांनी साहित्य चळवळीबरोबरच बहुजनांच्या सामाजिक चळवळींनाही आपल्या विविध भाषणांमधून, वैचारिक लेखनांतून बळ पुरविले आहे. अनेक लहान-थोर मित्र परिवार निर्माण केलेला आहे. अनेक नवोदित साहित्यिकांना, कवी-कलावंतांना मार्गदर्शन करताना ते स्वतःचा ज्येष्ठपणा, वय विसरून मनमोकळ्या गप्पा मारतात. तेव्हा त्यांच्यातील अस्सल मनाची पारदर्शकता जाणवते. कुटुंबापेक्षाही माणसाच्या उद्धाराची चळवळ मोठी असते, हे त्यांनी त्यांचा तरुण मुलगा संजय बागूल याचे निधन झाल्यावर दाखवून दिले. त्याच्या निधनानंतर आठच दिवसांनी त्याच्या स्मृतिप्रित्यर्थ बहुजनांच्या एकोप्यावर त्यांनी चर्चासत्र आयोजित करून चळवळीतील मान्यवरांची चर्चा घडवून आणली होती. ही घटना माझ्यासह अनेकांनी अनुभवली आहे. कोणताही प्रतिभावान साहित्यिक हा प्रथम कवीच असतो. याला अपवाद बागूल हेही नाहीत. त्यांच्या कवितेतील स्फोटक शब्द व्यवस्थेला उद्ध्वस्त करण्याची भाषा जेव्हा बोलतात, तेव्हा त्यांच्या नसानसांत मनूप्रणीत व्यवस्थेबद्दल किती चीड आहे, हे प्रत्ययास येते.

इथे तुझा जन्म झाला असेल तर
तुला व्हावेच लागेल आंबेडकर
युगांतरकारी आंबेडकर
क्रांतिकारी आंबेडकर
मनूचा मर्मांतक वैरी आंबेडकर...

जोपर्यंत मनुस्मृतीसारख्या धर्मग्रंथाबरहुकूम व्यवस्था अबाधित राहील, तोपर्यंत या देशात सर्वार्थाने स्वातंत्र्य, बंधुता, न्याय ही मूल्ये प्रस्थापित होऊ शकणार नाहीत. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी मनुस्मृती या धर्मग्रंथाचे दहन केले; परंतु व्यवस्थेने येथील मनामनांत रूजविलेली मनुस्मृती कोण बाहेर काढणार ? यासाठी केवळ आंबेडकर हवेत. एक नाही, दोन नाही तर घराघरांत आंबेडकर जन्मले पाहिजेत, जे मनूच्या संहितेचे समूळ उच्चाटन करतील. बाबूराव बागूल केवळ कवितेतून प्रश्न निर्माण करीत नाहीत, तर त्या प्रश्नांची उत्तरेही समर्थपणे देतात...

वेदाआधी तू होतास
वेदाच्या परमेश्वराआधी ही तू होतास...
तुझ्यामुळेच सजीव सुंदर झाली ही मही...

असा माणसाचा महिमा, त्याचे पोवाडे गाणारे बाबूराव बागूल तथा आबांचा जीवनपट उलगडून सांगणे/लिहिणे, एवढ्या छोट्या फ्रेममधलं त्यांचं जगणं निश्चितच नाही.

बाबूराव बागूलांच्या निर्वाणामुळे विद्रोहाचं एक पिंपळपान आता गळून पडलेलं आहे. परंतु त्यांनी हयातभर आपल्या साहित्यातून पेरलेलं समतावादी चिंतन, त्यांच्या कथा-कादंबरीतील माणसांचं लढवय्येपण, केवळ लेखक म्हणून नाही तर जाणीवपूर्वक त्यांनी 'स्व'तील जपलेला कार्यकर्ता पुढील काळातही अवघ्यांची ऊर्जा वाढविणारा ठरणार आहे.

❖❖❖

**गंगाधर अहिरे**
फ्लॅट नं. ३, थेटे अपार्टमेंट, महाराष्ट्र हायस्कूल जवळ,
उपनगर, नाशिक-६. फोन : ९४२२७६१४०४







अनुक्रमणिका

# अस्वस्थ करणारी विरहभाव स्पंदने 'चित्तबात'




प्राचार्य डॉ. भगवान ठाकूर

जीवनात स्त्री-पुरुष नात्यांची अनकेविध रूपं असतात. पती-पत्नी हे एक द्विदल वनस्पतीसम अविभाज्य आणि दीर्घकाळ असणारं नातं आहे. पुरूष कितीही पराक्रमी, कर्तृत्वसंपन्न असला तरी त्याच्या शौर्य-पराक्रमाची कवचकुंडले पत्नीच असते. विशेषतः आयुष्याच्या उतरणीला 'संध्याछाया भिवविती हृदया' अशा अवस्थेत आश्वासक, वत्सल सहवास पत्नीचाच असतो. अशा स्थितीत एका अत्यंत संवेदनशील, सात्त्विक, सर्जनशील, प्रतिभासंपन्न पतीची ज्यांच्या आयुष्यात कवितारूपी दुहिता आलीच मुळी आयुष्याच्या वानप्रस्थाश्रम काळात ! आणि पुढील जगण्यासाठी काव्यरूपी संजीवन देऊन गेली. कवितेनं कन्याप्राप्तीचे सुख दिले तर पत्नीने वात्सल्य भावाचं 'ओयॅसिस' बनून कवीच्या जीवनात सहचारिणी, सखी, माता, भगिनी अशा सर्वच रूपात मायेचं शिंपण केले.

श्री. राम कदम तळवेलकर हे ते कवी. त्यांनी जवळपास सेवानिवृत्तीनंतर काव्यनिर्मितीस प्रारंभ केला. एकूण दहा काव्यसंग्रह, एक कादंबरी, एक कथासंग्रह, एक गीतावली, एक ललित गद्यसंग्रह एवढी उदंड साहित्यनिर्मिती करणाऱ्या या सर्जकाची सर्जनप्रेरणा, उर्जास्रोत होती त्यांची पत्नी सौ. सुशिला राम कदम. घरी आल्या-गेलेल्याला तृप्त करणारी, सुगृहिणी, वात्सल्यसिंधु माऊली. एकूणच हे दांपत्य म्हणजे

*''ज्याला कुणाला आपला मानले*
*साथ त्याची कधी सोडली नाही*
*स्नेहसौख्याचे बंध गुंफले*
*नाती जिव्हाळीची कधी तोडली नाही.''*

पण नियती मात्र मोठी क्रूर-कठोर, पाषाण हृदयी असते. या दांपत्याचीच साथ तिनं तोडली. परस्परांचा जीव-शिव, पुरूष-प्रकृती, ब्रह्म-माया, शरीर अन् काया, आत्मा-परमात्मा याप्रमाणे अर्धशतकाचा सहवास (५३ वर्षे) असलेल्या सात्त्विक, सज्जन जीवांची ताटातूट झाली.

'जुनी पडकी उद्ध्वस्त धर्मशाळा' अशी अवकळा कवीमनाला आली. 'रात्रंदिन मज आठव तुझाच' अशी भावावस्था झाली. मृत्यू एक अटळ सत्य हे कळूनही

*''आभास तुझा मज खराचि वाटे*
*भासही गमे मज बरा''*

याप्रमाणे कवीची अवस्था झाली.

*''श्वास श्वासात विसावले*
*जीव-शिव एकरूपले*
*भिन्नत्व देहाचे संपले*
*जसे मोती अन् शिंपले*

असं उभयतांचं जगणं मृगजळासम क्षणात भासमान कसे झाले या प्रश्नानं कविमन सचिंत झाले. त्यातूनच त्यांचा प्रस्तुत 'चित्तबात' हा काव्यसंग्रह साकार झालाय. एका अर्थाने 'आत्म्याशी केलेली बातचित' असंच या कवितांचं स्वरूप आहे. इंदिरा संतांच्या कवितांवर (लेखनपूर्वार्ध) जशी पतीनिधनाची छाया जाणवते; तसं पत्नी विरहाच्या भावरंगछटा या कवितांमधून प्रकटल्या आहेत. पत्नीवर एवढं आतून भरभरून उत्स्फूर्तपणे मराठी काव्यात काही अपवाद वगळता फारसे कोणी लिहिलेले आढळत नाही. एका अर्थाने 'विलापिका' असेच या काव्यसंग्रहाचे स्वरूप

आहे पण त्यात जगण्याकडे पाहण्याची आणि मृत्यूशी चित्तबात करण्याची जी काव्यात्म रीत आहे ती मराठी काव्य प्रांतांत अनोखी आहे.

मूळातला कवीपिंड निसर्गाशी तादात्म्य पावून निसर्गप्रतिमांमधून स्वतःची सौंदर्यवृत्ती अभिव्यक्त करण्याचा ! आस्तिक, श्रद्धाशील मनात दाटून येणाऱ्या आत्मप्रत्ययी अनुभूतीला तितक्याच गेय, नादमधुर शब्दकळेतून सदेह करणारा हा कवी पत्नीच्या वियोगाने कुडीतला प्राणच जावा आणि उरावे फक्त कलेवर अशी कवीची मनःस्थिती झाली. पत्नीच्या आठवांची साठवण काळजाचे काठ तुडूंब भरल्यावरही ओसंडून आहे.

*'ती होती तेव्हा घरी नि दारी*
*घमघमणारी दरवळ होती*
*जरी आटले पाणी तरीही*
*वाळू खाल्ती खळखळ होती'* (पृ. १४)

पत्नीच्या आश्वासक सहवासाची एक विलक्षण सर्जनशील नशा होती.

*''पंच्याहत्तरीत तेव्हा*
*धुंदीत गात होतो*
*तुझीया समर्थ हाती*
*वणवेही पीत होतो''* (पृ. १७)

अपत्य अभाव असलेल्या या भावकवीला पत्नीची समजूतदार साथ होती म्हणूनच कवी म्हणतो,

*''प्राणात खोल खोल*
*जपतो उधाण वणवे''* (पृ. १८)

परंतु हा सहवासवसंत अनपेक्षित सरला. विरह शिशिर पातला

*''आंगण राहिलं सुनं सुनं*
*दारात उभी उन्हंच उन्हं''* (पृ. ९२)

अशी स्थिती झाली.

*''आता फक्त आठवात*
*तुझे असणे नसणे''* (पृ. ९१)

अशी अवस्था कवीमनाची झाली.

*''आहे पांघरून तुझ्या*
*आठवणींची दुशाला''* (पृ. ८९)

असं वाटू लागलं

*''तारा छेडतो मी आहे*
*झंकारच होत नाही*
*वाहतोच आहे वारा*
*ध्वनी ओंकारत नाही* (पृ. ८७)

अशी खंत कवी व्यक्त करतात.

*''एका आयुष्याचं दान*
*दान अपुरे अपुरे''* (पृ. ८२)

वाटू लागलंय

*''जिर्ण झाले आहे झाड*
*फक्त उरला पाचोळा*
*तुझी बखर लिहिण्या*
*नवा अक्षर सोहळा''* (पृ. ७७)

या शब्दात पत्नीचे गुणसंकीर्तन करण्याचा कवी प्रयत्न करतोय ! त्यासाठी

*''एकदाच ये ना रस्ता*
*परतीचा आठवून*
*प्रतिक्षेत सारे प्राण*
*डोळ्यामधी साठवून''* (पृ. ७४)

अशी दिवंगत पत्नीला विनंतीही करीत आहे.

परंतु वास्तवात हे होणे नाही. वास्तव हे आहे की;

*''अनामिक एक गाणे*
*सांडले आभाळभर''* (पृ. ७१)

*''सातबाराचा उतारा*
*उताराच हरवला''* (पृ. ७०)

एकाकी एकट्या कवीचं मन आता इथं लागत नाही. म्हणूनच कवी म्हणतो

*''आता यावेसे वाटते*
*तुझ्या सोबत जगाया*
*माझ्या पद्याच्या ओळीत*
*नव्या येतील रूबाया''* (पृ. ६८)

*असं सगळं झालंय*

*''जडावल्या डोळ्यामधी*
*भैरवीस आळविते''* (पृ. ६०)

या शब्दात मैफल संपत आल्याचं कवी सूचित करतो. जणू अखेरचे पर्व प्रारंभ झाले आहे.

*''सरतीच्या वाटेवर*
*उरतीचा न प्रकाश*
*ढसढसा रडणारे*
*डोईवरचे आकाश''* (पृ. ५७)

याचे भान प्राप्त होते.

*"शरीर जर्जर वरही पिकले*
*रस ना उरले गळण्या इतके*
*अजून नाही खरेच कळले*
*अंतिम तारीख कळण्याइतके"* (पृ. १६)

या अखेरच्या पडावापर्यंत कवीची भावावस्था येऊन पोहचते.

एकूणच 'चित्तबात' मधील अनुभव वाचकास अस्वस्थ करणारा आहे. यातील कविता अस्वस्थ करणारी विरहभावस्पंदने आहेत. कवीची भावावस्था अचूकपणे अभिव्यक्त करणारी शब्दकळा उदा. निळा उमाळा, देव्हाऱ्यातील सोयरा, उधाण वणवे, थेंबुटल्या दंवात, शापित दिशा, ऊरामधी ऊनकळा, जांभळेसे गूढ, तान्हुल्या मनाच्या इ. आणि विरहभाव व्यक्त करणाऱ्या प्रतिमा आणि प्रतिकांमुळे या अनुभव स्पंदनांनी कवितेची उंची राखली आहे.

चित्तबात (काव्यसंग्रह) राम कदम तळवेलकर,
शारदा प्रकाशन नौपाडा, ठाणे, पृ. ९२, मूल्य : ७० रुपये

**प्राचार्य डॉ. भगवान ठाकूर**
नौरोसजी वाडिया महाविद्यालय, पुणे

## देणगीदार – १ मार्च ते ३१ मे, २००८

| क्र. | दिनांक | नाव | रक्कम | |
|---|---|---|---|---|
| १) | ४-३-२००८ | डॉ. चंद्रशेखर बर्वे | १०००/- | योगक्षेमार्थ देणगी |
| २) | १५-३-२००८ | साहित्य अकादमी | १३०/- | योगक्षेमार्थ देणगी |
| ३) | १८-३-२००८ | राजीव माधव मदाने | ३५०००/- | स्मृतिदिनासाठी देणगी |
| ४) | २९-३-२००८ | मिलिंद गोविंद जोगळेकर | ५,०००/- | ग्रंथालयासाठी देणगी |
| ५) | १-४-२००८ | राजीव माधव मदाने | २५००/- | पुरस्कारासाठी देणगी |
| ५) | २-४-२००८ | मोरेश्वर शंकरराव जोशी | २०,०००/- | स्मृतिदिनासाठी देणगी |
| ७) | ५-४-२००८ | प्रभावती लक्ष्मण जोशी | २०,०००/- | स्मृतिदिनासाठी देणगी |
| ८) | ७-४-२००८ | प्रिया माधव फुलंब्रीकर | २०,०००/- | स्मृतिदिनासाठी देणगी |
| ९) | १५-४-२००८ | श्री. मधू नेने | ३००/- | परीक्षा विभाग देणगी |
| १०) | २३-४-२००८ | गिरिजा कीर | १०,०५०/- | स्मृतिदिनासाठी देणगी |
| ११) | २४-४-२००८ | प्रभावती नारायण कुलकर्णी | ७५००/- | नाट्यविभागासाठी देणगी |
| १२) | २४-४-२००८ | प्रभावती नारायण कुलकर्णी | १००१/- | बालविभागासाठी देणगी |
| १३) | २४-४-२००८ | सहाय्यक ग्रंथालय संचालक | २५००/- | ग्रंथालय अनुदान |
| १४) | २४-४-२००८ | विमल श. भालेराव | १०००००/- | स्मृतिदिनासाठी देणगी |
| १५) | २४-४-२००८ | विमल श. भालेराव | ४००००/- | स्मृतिदिनासाठी देणगी |
| १६) | २४-४-२००८ | विमल श. भालेराव | ५०००/- | पुरस्कारासाठी देणगी |
| १७) | ३०-४-२००८ | जयंत स. गोसावी | ३०००/- | नाट्यविभागासाठी देणगी |
| १८) | ९-५-२००८ | सक्षम कुलकर्णी | ५००/- | बालविभागासाठी देणगी (अक्षरबाग ग्रंथालयासाठी) |
| १९) | २१-५-२००८ | अनंत लक्ष्मण जोशी | १०१/- | ग्रंथालयासाठी देणगी |
| २०) | २८-५-२००८ | डॉ. सु. प्र. कुलकर्णी | २००/- | योगक्षेमार्थ देणगी |
| २१) | ३१-५-२००८ | ह. ल. निपुणगे | ३२००/- | योगक्षेमार्थ देणगी |

❖❖❖

## ❊ अभीष्टचिंतन ❊

**वयाची सत्तरी ओलांडून एकाहत्तराव्या वर्षात पदार्पण !**

कोषाध्यक्ष : श्री. ह. ल. निपुणगे  कार्यवाह (ग्रंथालय) : श्री. अनंत जोशी  कार्याध्यक्ष : डॉ. वि. भा. देशपांडे



अनुक्रमणिका

□

# 'रूप-अरूपाचे' :

## कवि अशोक नीळकंठ सोनावणे

□



राजन गवस

प्रतिभा-प्रतिमा नावाची काही गोष्ट असते. हे प्रतिभा नावाचं भूत आणलं कुणी ? तर इथं सुद्धा बुवाबाजी असते, भुतंखेतं असतात. यातलं एक भूत आपल्या डोक्यात असं बसलं की लिहिणाऱ्यांजवळ प्रतिभा असते आणि तो असा कुणी एक प्रतिभावंत असतो की त्यालाच फक्त लिहिता येतं. तर हे खरं आहे का ? म्हणजे ज्याच्या जवळ संवेदनशिलता आहे, तो समाजाच्या प्रत्येक गोष्टी दर्शवतो, ज्याच्यावर अनेक गोष्टींचा परिणाम होऊन तो माणूस अस्वस्थ होतो, तो प्रत्येकजण कलावंत असतो. त्या प्रत्येकाजवळ निर्मितीची शक्यता असते. सगळेच निर्मिती करतात असे नाही, काहींना लिहिता येतं.

'आई'वरती अनेकांनी लिहिलेल्या कविता मी वाचल्या आहेत आणि ही कविताही मी वाचतो आहे. आई ही एक शैक्षणिक संस्था आहे. शिक्षणाचं महाविद्यालय आहे, आपण मेकॉलेची शिक्षण व्यवस्था स्विकारल्यानंतर हर्बार्टच्या पंचपदीकडे गेलो. इथल्या मातीत कोणत्या शिक्षण व्यवस्था आहेत ? कोणत्या अध्यापन पद्धती आहेत ? याचा शोध घेतला तर असं लक्षात येईल की, आम्ही मराठी भाषिक आहोत, मराठी समुहात राहतो, मराठी शिकविण्यासाठी मराठी समाजाने निर्माण केलेली अध्यापन पद्धती होती. तर मेकॉले प्रणित अध्यापन पद्धती इंग्रजी शिकविण्यासाठी होती. ही पद्धत आपण स्वातंत्र्यपूर्वी आणि नंतरही तशीच वापरीत आहोत. त्यामुळे आम्हाला नीट शिकवता आलं. पण आमची एक शिक्षण व्यवस्था आहे, आणि होती असा विचार जर केला तर गुरूकुल पद्धतीचंच नाव पुढे येतं, पण ती सर्व समुहाची शिक्षण पद्धती नव्हती, ती एका वर्गाची होती. मग इतर वर्गाच्या शिक्षण पद्धती नव्हत्याच का ? जर हा समाज इतके हजार वर्ष चालत आलेला असेल तर याची निश्चित एक शिक्षण पद्धती नव्हतीच का? जर हा समाज इतके हजार वर्ष चालत आलेला असेल तर याची निश्चित एक शिक्षण पद्धती होती. ज्या मेकॉलेने आपल्याकडे शिक्षणपद्धती आणली त्यानं ब्रिटीश सभागृहात असं म्हटलं की, "हा देश सभ्य लोकांचा आहे, यांची स्वतःची शिक्षण पद्धती आहे, तुम्हाला हा देश पूर्ण मुठीत घ्यायचा असेल तर मी सांगतो ती शिक्षण पद्धती तुम्हाला राबवावी लागेल."

ब्रिटीश संस्थेनं त्याला परवानगी दिली की तू म्हणशील ती शिक्षण पद्धती राबव, तेव्हा मेकॉले म्हणतो; "माझ्या शिक्षण पद्धतीतून इथला माणूस शरीरानं फक्त भारतीय असेल, आणि मनाने पाश्चात्य असेल." आपण स्वतः शिकलेले जे-जे लोक आहोत त्यांनी हा प्रश्न विचारायला हरकत नाही की, मी मनाने भारतीय आहे का? इंग्रजी सत्ता गेल्यानंतर सुद्धा आपण तितकेच आंग्लाळलेले आहोत. आपण भारतीय राहिलेलो नाही. मेकॉलेने हे पूर्वोत्तर शिक्षण व्यवस्थेचं बीज काबिज केल्यानंतर आपण पहिली गोष्ट ही केली, की आपण श्रम नाकारले. मुलगी द्यायची असेल तर कुणाच्या घरात ? ज्याच्या घरात सगळे भाऊ राबतात, श्रम ही ज्या घरात प्रतिष्ठेची गोष्ट आहे, त्या घरात द्यायची. आयतेखाऊ माणसाला कुणी मुलगी देत नसत. अशा घरात की जेथे ती राबून खाईल असा विश्वास होता तिथं मुली देत.



अनुक्रमणिका

पण शिक्षणाने श्रमावरचा विश्वास संपवला. शिक्षणाने अनेक चांगल्या गोष्टी केल्या असतील पण भारतीय माणसाचा श्रमावरचा विश्वास काढून घेतला. आणि मनगटावरचा विश्वास काढून घेता-घेता त्यानं 'आई' ही 'इन्स्टीट्यूट' संपवली. आई ह्या गोष्टीकडे तिरस्कारानं बघायला लावले, ते नव्या शिक्षणाने. खेड्यातल्या मुलांना आपल्या आई-वडिलांविषयी तिरस्कार वाटू लागला. वाड्या-वस्तीतला कुणी मुलगा शिकायला शहरात आला असेल तर बाजारात फाटक्या लुगड्यानं आलेल्या आईची ओळख मित्राला करून द्यायला लाजतो. ही लाज शिक्षणानं आणली. या सर्वांचा परिणाम असा झाला की, त्यामुळे आमच्याकडे काहीही ज्ञान नव्हतं, सगळं ज्ञान अक्षरात आहे. व्यवस्थेत नाही असा भ्रम पसरवला गेला. जे निरक्षर असतात त्यांच्याकडे ज्ञान नसतं. त्याच्या परिमाणाने इथली निरक्षर जनता ही ज्ञानी नाही असा समज पसरवला गेला.

आई ही एकच 'इन्स्टिट्यूट' घेतली तर इथं ज्ञानाचा किती संग्रह आहे ! आई या विद्यापिठात ज्ञानाचं भांडार आहे. तिच्या गोधडीचा (वाकळं) टाका सरळ रेषेत जातो. तिच्याकडे काहीच ज्ञान नव्हतं ? गोधडीचं संपूर्ण चित्र बघितलं तर उत्तम चित्रकलेची रंगसंगीत त्या बाईच्या डोळ्यात होती. त्याच बाईनं भाजलेली ज्वारी-बाजरीची आख्खी भाकर किंवा पापड तोंडात टाकताच विरघळतात म्हणजेच तिच्याकडे उत्तम पाकशास्त्र होतं, उत्तम चित्रकला होती या बरोबर एक संगोपन होतं. आईनं मुलगी कशी वाढवायची ? हळूहळू वाढताना मुलगी निस्सर फुगडी घालायला लागायची. तिला झिम्मा खेळायला लावायचं, तिला घागर घुमवायला लावायची, हे उगाच नव्हतं. ती जेव्हा निस्सर फुगडी खेळायची तेव्हा तिच्या पिंढ्या घट्ट होऊ लागायच्या, ती जेव्हा कोंबडा करायची तेव्हा तिच्या मांड्यांचा घट्टपणा, आणि ती जेव्हा घागर घुमवायची तेव्हा तिचा श्वासोच्छ्वास आणि हृदयाचं आकुंचन-प्रसरण आणि ती जेव्हा भाकरी बडवायची तेव्हा तिला बाळंतपण पेलण्याइतकं सशक्त करण्याची जबाबदारी आई अडाणीपणी थोडीच घेऊ शकेल? तिच्याकडे संगोपन शास्त्राचं ज्ञान होत की नाही? आम्ही ते नाकारलं. खेडोपाड्याच्या बायकांकडून हजारो रेसीपी गोळा करून छापल्या तर उत्तम पाकशास्त्राचं पुस्तक तयार होईल.

आम्ही समज करून घेतला, की आम्हाला ज्ञानच नाही; आणि आम्हाला ज्ञान देण्याचे कंत्राटदार आहेत ते नेमलेले शिक्षक. त्यांची अक्कल कशात ? अक्षरात ज्ञान असतं या समजात. अक्षर सोडून ज्ञानाची व्यवस्था नव्हती, असं मानलं जातं. या सगळ्याचा परिणाम असा झाला की, एका भारतीय सशक्त ज्ञान-परंपरेला आपण मुकलो. परिसरातल्या झाडांची नावं सांगणाऱ्या एखाद्या धनगराला ठाऊक असलेली नावं, एखाद्या वनस्पती शास्त्राच्या प्राध्यापकाला सांगता येणार नाहीत. याचा परिपाक म्हणजे भिंतींवरच्या घोषणा 'अडाणी बाप घराला ताप, किंवा अडाणी आई घर वाया जाई.' माझी आई अडाणी होती, मी नाही वाया गेलो. माझा बाप अडाणी होता. माझ्या घराला कुठे ताप झाला ? या प्रकारच्या घोषणा करणाऱ्याला चौकात उभं केलं पाहिजे.

आमच्या ज्ञान परंपरा या उत्तम यंत्रणा आहेत. अडाणी माणूस म्हणजे बिनडोक ? घरं ज्यांनी बांधली त्यांना उत्तम वास्तूशास्त्र येत होतं ! तोफेचा गोळा भिंतीवर पडला तरी एखादा खळगा फक्त पडायचा. आज लोक 'ॲलोपॅथी'ला पर्याय म्हणून आयुर्वेदाकडे वळले. वैदुंकडे असलेलं वैद्यशास्त्र काय अडाणीपणाचं आहे ? या सगळ्यांकडे लक्ष देण्याचं काम कुणीही करत नाही. सोनवणे ते करीत आहेत. आई या संस्थेला, विद्यापीठाला ते केंद्रभागी मानत आहेत. या कवितेचं हे मला सर्वात मोठं महत्त्व हे वाटतं. 'आई' या एज्युकेशनल इन्स्टिट्यूटमध्ये कितीतरी प्रकारचं ज्ञान आहे. जातं दळतानाही नुसतं फिरवता येतं, ते फिरवताना तिला पीठ पडेपर्यंत त्याची एक शास्त्रीयता जपावी लागते. या सगळ्यात ते चूल पेटवणं, इंधनाची बचत करणं यातून आई निसर्गाशी समवाय राखून कसं जगावं ते शिकवते. निसर्गाची नासधूस करून आई जगायला कधी शिकवत नाही. ती समोरच्या कुत्र्याला भाकरतुकडा टाकल्याशिवाय जेवत नाही. ती काय शिकवते ? सहपणावाद आणि समूहभाव शिकवते. पाच मुलांपैकी लंगड्याला आई चोरून देते तेव्हा उरलेले चौघे धडधाकट आईवर राग धरतात. पण आई ओढगस्तीतल्या माणसाला उभं करते. दूध प्यायलं म्हणून मांजराला ती बेदम जिवे मारत नाही. तिला ठाऊक असतं की प्राणी,

पशुपक्षी भोवती असले तरच ती माणूस असते.

पण हे 'आईपणच संपत जाणं' ही गोष्ट ही कविता वाचत असताना मला प्रचंड अस्वस्थ करू लागली. ही प्रचंड 'इन्स्टिटयूट'च संपते की काय ? कोणत्या अर्थानं, तर ज्या मुली सगळ्या भोवतालच्या ज्ञानापासून शिक्षणानं सुटल्या आणि ज्या आईचं आईपण त्यांच्याकडे आलं त्यांच्याकडे आईचं विद्यापीठच आलं नाही. आई ही संस्था धोक्यात आली. शहरात तर मुलाच्या वाट्याला आई येणं बंद झालं. आणि आजीला त्या फ्लॅटमध्ये तर जागाच नाही. आईला सुद्धा आता मुलांना संगोपन करणं हे शिकवण्यासाठी ज्या देशात अंतरदेशीय कार्डावर "आईनं मुलाला सहा महिने तरी अंगावर पाजावं" असा संदेश छापलेला असतो, त्या देशात तरी आईपण शिल्लक आहे असं छातीठोकपणे कोण सांगेल ? 'आई' हे विद्यापीठ कुठे आहे ? याचा परिणाम अशक्त, कुपोषित बालकं जन्माला येणे असा झाला. पण कुपोषित बालकं फक्त कुपोषित पट्ट्यात जन्माला येतात असे नाही. महानगरातसुद्धा ही बालकं मोठ्या संख्येनं जन्माला येऊ लागली. ती तुम्हाला शरीरानं, व्हिटॅमिन्सने धडधाकट दिसतील, पण मानसिकदृष्ट्या त्याचं कुपोषण किती आहे ? बोर्ड चौथीच्या स्कॉलरशीपला नंबरात न आल्यामुळे मुलांना आठ-आठ दिवस न वाढणारे पालक तुम्हाला सर्वत्र भेटतील. हे ते कुपोषण ! म्हणजे मुलांना प्रचंड मार्क्स मिळावे म्हणून पालकांचा चाललेला आटापिटा बघितला की, आई हे विद्यापीठ धोक्यात आलं. मुलाला किती मार्क पडले ? ह्यापेक्षा शाळेत जातोस का ? हे आईला कळत नव्हते. तिला पहिल्यांदा गुणपत्रक दाखवलं तर त्याचं काही महत्त्व नाही. पास झाला बस झालं. यातून मला माझ्यासाठी जो वेळ मिळायचा; मग तो वेळ म्हशीवर बसायला असेल, झाडावर चढायला असेल, पोहायला असेल, विट्टी दांडूचा खेळ खेळायला असेल या सगळ्यातून त्याला मोकळा श्वास घ्यायचा असेल तर आजच्या आया त्या पोराला असा श्वास घेऊ देतात का हो ? या सगळ्यांचा एकदम बारीक विचार करायला ह्या पुस्तकानं मला भाग पाडलं.

कवी बरीच वर्ष शिक्षक असल्यामुळे त्याला हे महत्त्व पटलं असेल, पण मी तर असे म्हणेन की, हल्लीच्या शिक्षण पद्धतीतल्या व्यवस्थेतील अध्यापन पद्धती शोधणं हे आज शिक्षणापुढे भलं मोठं आव्हान आहे. या सगळ्या विचारांकडे मला हे पुस्तक नेतं, आणि मग माझ्यासमोर प्रश्न असा पडतो की, कवी काय काम करतो ? म्हणजे तो कविता लिहितो. कवी एक सळसळतं उभं झाड असतो, त्याची सळसळ सतत चाललेली असते, तो नेहमी व्यवस्थेच्या विरोधी असतो. तो कधीही व्यवस्थेचा समर्थक असू शकत नाही. आम्ही सांगलीला साहित्य संमेलनात गेलो आणि तेथे आबांच्या (आर. आर.) विषयी कविता वाचणारे पाचपन्नास कवी बघितले. मला आश्चर्य वाटतं, की कवी हा व्यवस्थेचा समर्थक कसा असतो ? तो सतत व्यवस्थेच्या विरोधात असतो, कारण त्याला व्यवस्था अधिक आदर्श पाहिजे असते; आणि तो अधिक चांगल्या समाजाची कल्पना करतो. म्हणून त्याला आताच्या सगळ्याठिकाणी दिसणाऱ्या वैगुण्यावर तो बोलतो.

सोनवणेंच्या पुस्तकातल्या दुसऱ्या सर्गातली जी कविता आहे ती अशा प्रकारच्या गोष्टींवर बोट ठेवते. हे कवीचं काम असतं की, एका आदर्श समाजाच्या स्वप्नात जे-जे आढळलं आहे, त्यावर कवी बोलतो. त्याच्या सहाव्या इंद्रियाला जे जाणवतं; ते भोवतालच्या लोकांना जाणवत नाही. म्हणून त्याचं सहावं इंद्रिय त्याला सतत अस्वस्थ ठेवतं. कर्तव्यदक्ष ठेवतं. यात कवी शब्दांची जुळवाजुळव करतो. तो सातत्याने अस्वस्थतेत बुडलेला असतो आणि हे अस्वस्थपण या कवितेत तुम्हाला पदोपदी बघायला मिळतं.

मित्रहो, या कवीनं जे काही काम केलेलं आहे या सगळ्यात सर्वात मोठं म्हणजे 'आई' ही 'इन्स्टिटयूट' केंद्रभागी आणली आहे. आणि तेवढं काम सुद्धा महाराष्ट्राला फार मजबूत करणारं किंवा वेगळी दृष्टी देणारं आहे, म्हणून या संग्रहाचं महत्त्व आहे. एक चांगला कवितासंग्रह वाचायची संधी सोनवणेंनी मला दिली याबद्दल त्यांचे आभार मानतो.

❖❖❖

**रूप-अरूपाचे : कवी अशोक नीळकंठ सोनावणे,** प्रकाशक : शब्दालय, वॉर्ड नं. ७, जनता हायस्कूल शेजारी, श्रीरामपूर, जि. अहमदनगर.

**राजन गवस**
द्वारा : मौनी विद्यापीठ, गारगोटी, जि. कोल्हापूर



अनुक्रमणिका

□

## दृष्टिक्षेप
# ‘प्रकाशाचे अंग’ :
## डॉ. नीलिमा गुंडी

□

दीपक करंदीकर




डॉ. नीलिमा गुंडी या पुण्याच्या मान्यवर कवयित्रीच्या ‘स्पर्शरिषा’ (१९९६) नंतरचा ‘प्रकाशाचे अंग’ हा दुसरा काव्यसंग्रह. कवितेच्या स्पर्शरिषेने भोवतालच्या जगाशी जोडल्या गेलेल्या डॉ. नीलिमा गुंडी यांचा १९९६ नंतरचा हा काव्यप्रवास ! एक स्त्री आणि एक व्यक्ती या नात्याने मानवी संस्कृतीशी जोडलेल्या नात्याचेच प्रतिबिंबित रूप म्हणजे ‘प्रकाशाचे अंग’. जगण्याला, व्यक्ती आणि समाज यापलिकडच्या मिती असतात, याची त्यांना प्रखर जाणीव होत गेली. त्याचबरोबर निसर्ग आणि अपार्थिवता यांची ओढ त्यांच्या कविमनाला लागली. ही जाणीव आणि ही ओढ त्यांच्या ‘प्रकाशाचे अंग’ मधील एकूण ५२ काव्यरचनांमधून शब्दबद्ध झाली आहे.

*‘एका पावलात नाही गाडता येत*
*इथले दुःख पाताळात*
*नि एका झेपेत नाही ओलांडता येत*
*इथले समुद्र सात’*

अशा प्रकारच्या आंतरिक जाणिवेस त्यांनी कवितेचा शब्द दिला आहे.

मोहेंजोदरोचे भग्न अवशेष आणि वेरुळचे बोलके पाषाण मनाच्या क्षितिजात वस्तीला ठेवून घेतल्यावर, उद्यासाठी नवीन ओळी लिहिताना एका अत्यंत प्रगल्भ जाणिवेतून त्या सांगतात ती, अज्ञातातील वळणाऱ्या वाटांवर चालत राहणाऱ्या पावलांची ओढ ! त्याची गोष्ट; आणि डोंगरकपारीतून हसत उगवणाऱ्या इवल्याशा फुलाची रंगांनी गोंदवलेली कथा !

त्यांच्या काव्यसंग्रहातील बहुतेक सर्व कविता मुक्तछंदाचे गोंदण घेऊन आलेल्या. त्यामुळे त्यातील अर्थसमृद्धी ‘अंतर्नाद’, ‘चाहूल’ सारख्या कवितांतून रसिकाभोवती मोहक फेर धरतात. लहानपणीच्या कचकडी, तकलादू बाहुलीपेक्षा आजच्या व्यवहारी समाजात टिकून राहण्यासाठी जड शिशाचा गोळा बुडाशी बसवलेली भरभक्कम बाहुली त्या मागतात.

तरी, व्यवहारी जमिनीवरून चालतानाही मऊ ओल्या गवताच्या हळुवार स्पर्शासरशी त्यांना स्फुरतात कवितेच्या नाजूक ओळी ! जसे पाखरांचे झर्रकन् उडणारे थवे !!

स्त्री आणि समाजाचे नाते, ‘वडारीण’ ‘कविता झाडांसाठी’, ‘द्रौपदी’, ‘तिचे न ऐकण्याचे वय’ ‘नाते’, ‘श्यामची आई’ (मुलांबरोबर स्वतःला घडवणारी) आणि आधुनिक वाल्याकोळ्याच्या बायकोचा ‘बेरकी’ चेहरा त्या धीटपणे दाखवतात. स्त्रीमुक्ती वगैरे आधुनिक चळवळींची बंधने झुगारून देतात. आईपणाचे घेतलेले वाण अभिमानाने फडकवत ठेवण्याची क्षमता स्वतःत निर्माण करतात.

लहानपणी शिकलेल्या यमकाच्या बंधनांचा तीर त्यांना जाचक वाटू लागतो. यमकांची गोत्रे एकमेकांशी जुळत नाहीत. तरी कवितेच्या सहज गूढ स्वरूपाविषयीचे कुतुहल त्यांच्या मनात कायमचे कोरले आहे.

कवितेचे बंधनविरहीत मोकळे अवकाश मिळालेली ही कवयित्री, अधिक डोळसपणे, व्यक्ती आणि समाज या पलिकडच्या मिती आपल्या शब्दकवेत पकडू लागते.

उल्लेखनीय दखल :

## 'निरंतर शिक्षण धारा'चा डॉ. बाबासाहेब आंबेडकर - विशेषांक



महाराष्ट्र राज्य साक्षरता-परिषदेच्या अंतर्गत प्रौढ-शिक्षण विभागाने 'निरंतर शिक्षण धारा' हे त्रैमासिक सुरू केले आहे. शिक्षण विभाग प्रधान सचिव श्रीमती शर्वरी गोखले, प्रौढ शिक्षणविभागाचे संचालक (संपादक) श्री. अनिल बेडगे, कार्यकारी संपादक-श्री. इरगोंडा पाटील आणि संपादक-मंडळाने अभ्यासू मेहनत घेऊन डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या ओजस्वी, बहुआयामी चरित्राचे दर्शन घडविणारा विशेषांक निर्माण केला आहे. केवळ विशेषांक म्हणून त्याचे मूल्यमापन अपुरे होईल. कारण हे चरित्र म्हणजे केवळ जन्म-मृत्यूच्या चौकटीतला आलेख नाही; तर जीवनाभिमुख ओजस्वी चळवळीच्या उगमापासून ते महासागरापर्यंतच्या विकासाचे दर्शन घडविणारा ऐतिहासिक दस्तऐवज आहे. संपादकांनी याच्या अधिकृत ऐतिहासिकतेला जिवापाड जपल्याचे प्रत्येक पानातून दिसते. डॉ. बाबासाहेबांच्याच शब्दात त्यांचे 'बालपण' व्यक्त झाले आहे; तर त्यांच्याच भारतीय 'घटनेवरील अखेरच्या भाषणाने' या चरित्रांचा कळसाध्याय साधला आहे. बालपण ते घटनेचा शिल्पकार यामधील संघर्षमय जीवनाच्या बहुआयामी विकासाचे दर्शन घडविण्यात अभ्यासू मान्यवरांचा मोलाचा सहभाग आहे. शा. शं. रेगे, वामन निंबाळकर, डॉ. रझिया पटेल, प्रा. जैमिनी कडू, ॲड. बी. सी. कांबळे, ज्योति लांजेवार, डॉ. शरणकुमार लिंबाळे, डॉ. भालचंद्र मुणगेकर यांच्या अभ्यासपूर्ण लेखांनी आणि दुर्मिळ छायाचित्रांनी हा अंक, एका ओजस्वी इतिहासाच्या पुनःप्रत्ययाचा आनंद देतो. एक ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून त्याचे निर्मितीमूल्य आहे. महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे या सर्वांचे अभिनंदन !

**डॉ. सु. प्र. कुलकर्णी, संपादक**

---

'ती संध्याकाळ', 'पाने', 'सुनामी', 'तेव्हापासून' या कवितांमधून ती 'पल्किडची मिती' दाखवू लागली. साक्षेपी समीक्षक प्रा. रा. ग. जाधव, डॉ. नीलिमा गुंडी यांच्या कवितेविषयी म्हणतात की, 'शब्दार्थाचे चिकित्सक भान, भावनात्मक आशय नेमक्या, मोजक्या शब्दात व अभिनव प्रतिमेत अचूकपणे व्यक्त करण्याची क्षमता आणि विद्यमान वास्तवाच्या गुंतागुंतीची यथार्थ जाणीव असणारी व करून देणारी कविता !'

हरवलेल्या वाटा शोधणारी माणसे, झाडांच्या पानांवर सावल्या होऊन रेंगाळणारी संध्याकाळ, यमकाचा भोज्जा, काठाचे ओठ मिटून गप्प बसलेले पाणी, यासारख्या त्यांच्या असंख्य प्रतिमा 'प्रकाशाचे अंग' भर पानोपानी पसरल्या आहेत.

ह्या संग्रहातील सर्वच कविता पुन्हापुन्हा वाचून अर्थ, भावार्थ, मतितार्थ सोडवून घेण्याचा ध्यास लावतात.

**प्रकाशाचे अंग (काव्यसंग्रह)** डॉ. नीलिमा गुंडी, स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे)

**दीपक करंदीकर**
१०४४, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.
फोन : ०२०-२४४९२४२७

---

## नवे आजीव सभासद

१) चव्हाण सर्जेराव पंढरीनाथ , सिद्धेवाडी
२) पाटील मोहन ज्ञानेश्वर, पंढरपूर
३) जोगळेकर पराग गंगाधर, पुणे
४) शिंदे राणी चंद्रकांत, पुणे
५) शोभणे रवींद्र केशवराव, नागपूर
६) वैद्य विभावरी दिनकर, पुणे
७) आढावे वाल्मिक शंकर, म्हसदी
८) हसबनीस रोहिणी चंद्रकांत, पुणे
९) गानू चंद्रशेखर गोविंद, पुणे
१०) पाचपुते अर्चना अशोक, पुणे
११) गोखले अनंत प्रभाकर, पुणे
१२) पेटकर शीतल महेश, पुणे
१३) देशपांडे अरुण विठ्ठल, पुणे
१४) गुजराथी रश्मी रवींद्र, पुणे
१५) दामले सुधीर श्रीकृष्ण, पुणे
१६) हळबे मुकुंद दत्तात्रय, पुणे
१७) भाटे सरोजा, पुणे
१८) पवार सुनिताराजे किसन, पुणे
१९) पवार किसन सखाराम, पुणे
२०) घोंगडे उमेश वि., पुणे
२१) पटवर्धन संजय नारायण, पुणे
२२) घुले जयश्री संभाजीराव, पुणे
२३) शेठ प्रणव, पुणे
२४) चव्हाण जगन्नाथ मनोहर, तळेगाव
२५) गोसावी सदानंद सुरेंद्र, पुणे
२६) मोराळे महालक्ष्मी, पुणे

❖❖❖



अनुक्रमणिका

□

ग्रंथ परीक्षण

# आर्त :

## जीवनविषयक जाणिवा समृद्ध करणाऱ्या कथा

□

प्रा. मिलिंद जोशी




*'आर्त'* हा मोनिका गर्जेंद्रगडकर यांचा मौज प्रकाशनाने प्रकाशित केलेला दुसरा कथासंग्रह. 'भूप' या त्यांच्या पहिल्या कथासंग्रहातून त्यांचे वेगळेपण वाचकांना जाणवले. कथालेखनासाठी आवश्यक असलेली सर्व प्रकारची प्रगल्भता त्यांच्या लेखनात दिसली. मोनिका गर्जेंद्रगडकर या मराठीतील ज्येष्ठ साहित्यिक (कै.) विद्याधर पुंडलीक यांच्या कन्या. पुंडलीकांनी लघुकथा लिहिल्या. गर्जेंद्रगडकरांच्या दीर्घकथा आहेत. आपल्या वडिलांचा समृद्ध आणि संपन्न वारसा समर्थपणे पुढे चालविताना त्यांनी स्वतःचे वेगळेपण सिद्ध केलेले आहे.

'आर्त' या कथासंग्रहात एकूण सहा दीर्घकथा आहेत. आपल्या जवळची माणसं आपल्याला न उमगणं, न समजणं ही मानवी मनाची खरी शोकांतिका आहे. त्यातून होणारी भावनिक घुसमट, जगण्याचा तीव्र झालेला संघर्ष, नात्याचं उसवत जाणं हे या कथांमधून संयमितपणे आणि प्रभावीपणे अधोरेखित झालेलं आहे. या कथांनी जीवनाचे प्रवाहीपण अथवा साचलेपण नाकारलेले नाही. म्हणून त्या वाचकांना जास्त भावतात.

'श्रद्धा' या पहिल्या कथेमध्ये धर्मामुळे एकाच कुटुंबातल्या रक्ताच्या नात्याच्या माणसांमध्ये आलेली तेढ आहे. खरे तर माणसातल्या दिव्यत्वाचा त्याला परिचय करून देणे हे धर्माचे काम. पण धर्मांध झालेला पोटचा गोळा जेव्हा धर्मापुढे जन्मदात्या आईच्या भावनेचाही मुलाहिजा ठेवत नाही; तेव्हा त्या कुटुंबाची होणारी घुसमट किती भयावह असते यावर लेखिकेने प्रकाश टाकलेला आहे. अनर्थकारी धर्मवेड माणूसपण नाकारते; आणि गुलामगिरीच्या शृंखला जबरदस्तीने घालू लागते. याचे अस्वस्थ करणारे चित्रण या कथेमध्ये आहे. 'बावाची आई' ही या कथासंग्रहातील दुसरी कथा. एक मुलगी, तिचे गतिमंदबाबा आणि त्या मुलीची आई यांच्या नात्यातले विस्कटलेपण या कथेत आहे. त्या मुलीची आई गतिमंद नवऱ्याच्या रूपाने मिळालेलं दुर्दैवी दान स्वीकारायला तयार नाही. मुलीला दोघेही हवे आहेत. या दुभंगलेल्या त्रिकोणाच्या दोनच बाजू सावरू पाहणारी त्या मुलीची आजी हे मानवी स्वभावाचं एक वेगळंच रूप आहे. मुलीने आईकडे राहायचे की वडिलांकडे ? या प्रश्नाचे उत्तर न्यायालयात मिळणार असते. आजीच्या आकस्मिक निधनानंतर ती मुलगी गतिमंद वडिलांची, बावाची आई होणे पसंत करते. अशा आशयाची ही दुसरी कथा मानवी नातेसंबंधातील धुक्याचे अनेक पदर उलगडून दाखविते. 'रूट्स' ही तिसरी कथा वाचकांना अस्वस्थ करणारी आहे. स्वतःच्या वाट्याला सुखी, समृद्धी देणारं आयुष्य यावं यासाठी एक माणूस आपले सगळे पाश, सगळी मुळं तोडून परदेशात स्थिरावतो. त्याच्या जीवनात उसळलेल्या लाटा त्याला वेगळ्यांच किनाऱ्यावर आणून उभ्या करतात. तो सर्वार्थाने खचतो, त्याला उभारी मिळावी यासाठी डॉक्टर उपाय सुचवितात. तो मूळं शोधण्याचा, जुन्या नात्यांच्या स्मृती उजळविण्याचा. हे सारं करण्याची जबाबदारी येते ती त्या माणसाच्या भावावर, जो सदैव मुळाशी, 'रूट्स्'शी प्रामाणिक राहिला पण त्याला रूट्स्ने काय दिलं? अपेक्षाभंग, असहायता आणि कायम उपरेपणाची भावना. तरीही आपल्या भावासाठी तो रूट्स् शोधण्याच्या कामी त्याची मदत करतो ती कर्तव्य भावनेने. मानवीजीवनातील भावनिक गुंतागुंत किती आणि कशी जटिल आहे, याचा प्रत्यय ही कथा वाचताना येतो. आईचं नातं हे या जगात सर्वात निरपेक्ष, निरलस, निर्मळ आहे. यावर श्रद्धा ठेवून भारतीय समाजजीवनाची वाटचाल सुरू आहे. पण बदलत्या



अनुक्रमणिका

जीवनप्रवाहात या नात्याचा एक वेगळा पैलूही दिसतो. तो कुठेही पारंपरिक श्रद्धांना उद्ध्वस्त करीत नाही. पण 'आई' नावाच्या नात्याची वेगळी किनार दाखवून जातो. तो नात्याचा वेगळा पदर आई आणि मुलगी यांच्याशी संबंधित असलेल्या 'संक्रमण' या कथेत आहे. तरुण विवाहित मुलगा गमावलेले आई-वडील, त्यांची सून, तिच्या पोटात वाढणारा नातू, तिच्या भविष्याचा आ वासून उभा राहिलेला प्रश्न आणि या साऱ्या प्रकारात कोठेही भावनिकतेच्या आहारी न जाता ती सून जे व्यावहारिक उत्तर शोधते व त्यातून मानवीसंबंधाचे जे नवे, काळाशी जुळवून घेणारे आणि थोडासा धक्का देणारे वेगळे रूप दिसते ते 'नातं' या कथेमध्ये. 'जन्म' ही या कथासंग्रहातील शेवटची कथा. ती या कथासंग्रहाचा कळसाध्याय आहे. कलाकार असणाऱ्या आई-वडिलांच्या पोटी जन्माला आलेला मुलगा तोही पुन्हा कलाकारच. आई-वडील-मुलगा हा नात्याचा एक वेगळा त्रिकोण आणि त्यांचा सर्जनाच्या पातळीवरचा भावनिक संघर्ष हा या कथेचा विषय. तो लेखिकेने विलक्षण ताकदीने हाताळला आहे. वरवर पाहता या कथा कौटुंबिक वाटतात. पण लेखिकेने मोठ्या पटलावरती त्यांची मांडणी केलेली आहे. कुटुंब ही समाजाची छोटी आवृत्ती मानली जाते. त्या अर्थाने या कथांचा परीघ खूपच व्यापक आहे. सकस कथाबीजामुळे त्या सशक्त झाल्या आहेत. स्त्री-पुरुष नातेसंबंधातली गूढता सनातन आहे. तिचा शोध घेण्याचा या कथालेखिकेचा प्रयत्न स्तुत्य आहेच. स्त्री-पुरुष नातेसंबंधांबरोबरच स्त्रिया-स्त्रियांमधील नात्यांचा शोध आणि पुरुषा-पुरुषांमधील नातेसंबंधांचा शोधही या कथांमधे आहे. त्यामुळे तीन पातळ्यांवरून अतिशय सूत्रबद्धपद्धतीने मानवी जीवनव्यवहाराचा तळ शोधण्याचा लेखिकेचा प्रामाणिक प्रयत्न या कथांमधून दिसतो; आणि कथांचे वेगळेपणही सिद्ध करतो.

प्रेम, द्वेष, असूया, लोभ, अपेक्षा, स्पर्धा, कृतघ्नता आणि कृतज्ञता यांच्या आधारावर मानवी नातेसंबंधातील जीवन व्यवहाराचा पोत ठरत असतो, बदलत असतो. अमुक एका वाटेने आपण गेलो तर आपल्या पदरात अपेक्षाभंग, असहायता, हतबलता येणार हे माहीत असूनही माणसं त्या वाटेने चालत राहतात. हे त्यांच्या माणूस असण्याचे खरे लक्षण आहे. व्यर्थतेतला अर्थ शोधणे ही तर मानवी स्वभावाची खासियत. या कथा संग्रहातली सगळी पात्रं या माणूस असण्याच्या सगळ्या कसोट्यांवर उतरतात. म्हणून ती उपरी, परकी किंवा काल्पनिक वाटत नाहीत. सभोवतालच्या सामाजिक परिसरातली वाटतात. गुलाबाच्या पाकळ्या उलगडत उलगडत संपूर्ण फुलांचे सर्वांगसुंदर दर्शन घडावे किंवा वेगळे कसब असलेल्या एखाद्या कलाकार स्त्रीने विणलेल्या शेल्याचे उभे-आडवे धागे जितक्या सहजपणे, ठळकपणे दिसावेत तितक्या प्रभावीपणे या कथांमधल्या व्यक्तिरेखांचे अंतरंग लेखिकेने दाखवून दिलेले आहेत. या कथांमधली छोटी पात्रेदेखील आपल्या गुणवैशिष्ट्यांसह वाचकांवर स्वतःचा वेगळा ठसा उमटवून जातात.

लांबी, रुंदी आणि खोली हे शब्द केवळ क्षेत्रफळाशी निगडित आहेत असं मानण्याचं कारण नाही. मुळात मानवी जीवन त्रिमित आहे. थ्री डायमेन्शनल. लांबी म्हणजे त्याला लाभलेले आयुष्य. रुंदी म्हणजे त्याचं जगणं आणि खोली म्हणजे त्याला सापडलेला जीवनाचा अर्थ, त्याने जीवनाचा तळ, शोधण्याचा केलेला प्रयत्न. या कथांबाबतीत एक गोष्ट प्रामुख्याने जाणवते आशयाची उंची आणि चिंतनाची खोली यांचा मनोहारी संगम या कथांमधे आहे. आकृतीबंधाबरोबरच त्या कथाही मितीत आहेत. (Well dimensioned) हे देखील या कथांचे वेगळेपण आहे. दीर्घकथांमधे, कथाकारांना वर्णनाचे स्वातंत्र्य असते. पण अनेकदा त्यातच कथा वाहवत जाते आणि हरवतेही. वर्णनाचा संयम आणि शब्दांचा ताजवेतोल वापर यामुळे या कथा अधिक परिमाणकारक झाल्या आहेत. एखाद्या अभियंत्याने रेखाटलेल्या आराखड्यात जशी एकही रेषा कमी किंवा अधिक नसते. आराखड्याच्या परिपूर्णतेसाठीच तिची योजना असते. तोच नेटकेपणा, नेमकेपणा, या कथांमध्ये आहे. त्यामुळे या कथा वाचकांना आपल्या कथाविश्वाशी जोडून घेतात. त्या वाचकांना वेगळी अनुभूती देताना त्यांना अंतर्मुखही करतात. वाचकांच्या जाणिवा अधिक समृद्ध करून त्यांना 'आर्त' करणाऱ्या या कथा आहेत. या दशकातल्या उत्तम कथासंग्रहाची यादी बनवली तर मोनिका गजेंद्रगडकर यांच्या 'भूप' आणि 'आर्त' या कथासंग्रहांना वरचे आणि मानाचे स्थान द्यावे लागेल. त्यांच्या या दीर्घकथांमध्ये कादंबरीलेखनाची बीजं सापडतात. त्यांनी आता कादंबरीलेखनाकडे वळायला हवे.

❖❖❖

**'आर्त' मोनिका गजेंद्रगडकर**

मौज प्रकाशन, पृष्ठे - १६९, किंमत : १६० रु.

**प्रा. मिलिंद जोशी**

बी१-१२, रविराज टेरेस, सुखसागरनगर, कात्रज, पुणे ४११ ०४६.

दूरभाष : (०२०) २६९६३५०९, ९८५०२७०८२३

□

ग्रंथ परीक्षण :

# 'स्त्री विकासाचे नवे क्षितिज :

## स्वातंत्र्योत्तर काळातील 'स्त्री'च्या प्रगतीचा आलेख

□

डॉ. मंदा खांडगे



'स्त्रीविकासाचे नवे क्षितिज' हा डॉ. स्वाती कर्वे यांनी संपादित केलेला ग्रंथ या दशकातील महत्त्वपूर्ण ग्रंथ आहे. या ग्रंथामध्ये १९५१ ते २००७ म्हणजे स्वातंत्र्योत्तर काळखंडातील नियतकालिकांतील ७२ विविध विषयांवरील निवडक लेख संग्रहित केले आहेत. वास्तविक पाहता गेल्या ५० वर्षात विविध नियतकालिकांतून विपुल स्फुट लेखन झाले आहे. त्यातील काही निवडक लेखांची पुस्तकेही झाली आहेत. या ग्रंथासाठी जे स्फुट वैचारिक लेख निवडले आहेत ते स्वाती कर्वे यांनी काही अपवाद वगळता बहुतांशी लेख विचारपूर्वक निवडले आहेत. या लेखांचे वर्गीकरण करून त्यांनी या लेखांची सहा भागात विभागणी केली आहे. नवा काळ नवे प्रश्न, स्त्रीवादी लेखन : स्वरूप व विस्तार. समीक्षाविविधा, केल्याने भाषांतर, नव्या वाटा नवी वळणे आणि नवे क्षितिज; अशी सहा भागात विविध विषयांची विभागणी केली आहे. डॉ. स्वाती कर्वे यांची अतिशय अभ्यासपूर्ण अशी ८५ पानांची विस्तृत प्रस्तावना ग्रंथाला लाभली आहे.

डॉ. स्वाती कर्वे या स्त्री साहित्याच्या अभ्यासक आहेत. 'स्त्री साहित्याचा मागोवा' या साहित्यप्रेमी भगिनी मंडळाच्या प्रकल्पासाठी 'नियतकालिकांतील स्त्रियांचे योगदान' या शोधनिबंधाचे काम करीत असताना नियतकालिकांतून स्त्रियांनी लिहिलेल्या प्रचंड लेखनाने त्यांचे लक्ष वेधले. स्वातंत्र्यपूर्व कालखंडातील स्त्रियांचे लेखन हे मर्यादित अनुभव विश्वातले होते. हा स्त्रीच्या धडपडण्याचा काळ होता. स्त्रीला आत्मभान येण्यापूर्वीचे ते लेखन होते. पण स्त्री मनाचे हुंकार या लेखणीतून उमटत होते. काळाच्या संदर्भात हे लेखन महत्त्वाचे होते. त्याचे मोल जाणून तत्कालीन नियतकालिकातील लेख निवडून कर्वे यांनी 'स्त्री विकासाच्या पाऊलखुणा' हा ग्रंथ संपादित केला. त्याला विवेचक अशी प्रस्तावना लिहिली. 'स्त्री विकासाचे नवे क्षितिज' हा त्याच्या पुढचा टप्पा आहे. या संपादित ग्रंथामध्ये १९५१ ते २००७ म्हणजे स्वातंत्र्योत्तर कालखंडातील स्फुट वैचारिक लेखांचे संपादन केले आहे.

पन्नास वर्षांच्या कालखंडातील विपुल लेखनातून निवडलेले ७२ लेख म्हणजे बदलत्या सामाजिक परिस्थितीतील स्त्रीच्या विस्तारलेल्या क्षितिजाची साक्ष आहेत. स्त्रीला संधी मिळताच स्वकर्तृत्वाने तिने केलेली प्रगती, तिच्या विचारांची झेप, तिच्या प्रगत झालेल्या वैचारिक जाणिवा, तिच्या लेखनात आलेली प्रगल्भता, याचे सम्यक्‌दर्शन या ग्रंथासाठी निवडलेल्या लेखांतून दिग्दर्शित होते. स्त्रीचे संपन्न झालेले अनुभवविश्व, तिची वैचारिक क्षमता त्यातून दिसते.

प्रस्तावनेत डॉ. स्वाती कर्वे यांनी स्वातंत्र्योत्तर कालखंडातील राजकीय घटना, सामाजिक स्थिती, स्त्रियांना मिळालेले हक्क, स्त्रियांचे प्रश्न, राजकीय घटनांमधील स्त्रियांचा सहभाग, १९७५ मधील जाहीर झालेले आंतरराष्ट्रीय महिला वर्ष त्यानंतरची महिलांच्या दृष्टीने महत्त्वाची पंचवीस वर्षे, स्त्रीवादी विचारसरणी,



अनुक्रमणिका

यांचा धावता आढावा घेतला आहे. नवीन पर्वातील स्त्रीवादी नियतकालिकांचे कार्य, स्वातंत्र्योत्तर काळातील कायदेशीर तरतुदी-१९७५ नंतरच्या स्त्रीवादी संघटनांचे कार्य, अशा विविध आयामांना स्पर्श करीत प्रस्तुत कालखंडातील स्त्रीकर्तृत्वाचा थोडक्यात आढावा घेतला आहे. या कालखंडात स्त्रियांचे कार्यक्षेत्र विस्तारले, शिक्षण, साहित्य, क्रीडा, नाट्य, चित्रपट, संगीत अशा विविध क्षेत्रात तिची दमदार पावले उमटू लागली. स्वातंत्र्योत्तर काळातील स्त्रियांच्या प्रगतीचे चित्र प्रस्तुत ग्रंथातील लेखांतून स्पष्ट होत जाईल. त्याचबरोबर सामाजिक स्थितिगती आणि बदलते सांस्कृतिक संदर्भही स्पष्ट होतील, असा आशावाद व्यक्त केला आहे.

'नवा काळ नवे प्रश्न' या विभागात १२ लेख समाविष्ट आहेत. स्वातंत्र्योत्तर काळातील सामाजिक अंगाचा विचार करताना– स्त्रियांचे बरेच प्रश्न सुटले असे वाटत असतानाच काही प्रश्न नव्याने उपस्थित झाले. त्यात स्त्रीची नोकरी, तिचे लग्नाचे वाढते वय, अविवाहित स्त्रियांचे वाढते प्रमाण, असे प्रश्न दिसत असले तरी आपले प्रश्न सोडविण्याची वैचारिक क्षमता त्यांच्यामध्ये येऊ लागली होती. हे लेख वाचत असताना या प्रश्नांचे निराकरण करण्याची प्रगल्भता जाणवते. 'अविवाहित स्त्रियांचे प्रश्न' (कमल चांदुरकर) नोकरी करणाऱ्या स्त्रियांची कार्यक्षमता कशी वाढेल, (सौ. प्रतिभा पटवर्धन) 'आपल्या कौटुंबिक नात्याचा दर्जा'. (शांता किर्लोस्कर) 'त्यांनी लग्न का केलं नाही.' या लेखाच्या शीर्षकातूनच स्त्रीचे नवे मानस, तिची त्या दृष्टीने होत असलेली घडण, नवीन विचारधारा, उपस्थित प्रश्नांना सामोरे जाताना तिच्या विचारांची दिशा स्पष्ट होते.

या विभागात निवडलेला 'मुली मॅट्रिक झाल्या पुढे ?' हा मालतीबाई बेडेकरांचा लेख मात्र खटकतो. नोकरी करण्याचा उद्देश स्पष्ट असणाऱ्या, प्रसंगी नोकरी करण्याचा प्रसंग आला तर धमक असणाऱ्या मुली वगळल्यास आणि लग्नानंतरही हमखास सामाजिक राजकीय क्षेत्रांत काम करीन अशी खात्री असणाऱ्या मुली वगळल्यास इतर बहुसंख्य मुलींना कॉलेज शिक्षण हे निरूपयोगी आहे; असेच म्हणावे लागते. हे मालतीबाईंसारख्या उच्चशिक्षित, वैचारिक प्रगल्भ जाणीव असलेल्या विचारवंत लेखिकेने काढलेले उद्‌गार अतिशय खटकतात. सकारात्मक विचार त्यांनी मांडायला हवा होता. असे मनात आल्यावाचून राहत नाही. स्त्री संघटनांची सामाजिक दृष्टीने, असणारी आवश्यकता 'उलट संघटना वाढवावयास हवी.' या लेखात शांता मुखर्जी यांनी ठामपणे मांडले आहे. हे लेख या कालखंडातील स्त्री विचारांचा आलेख सुस्पष्टपणे मांडणारे आहेत.

दुसरा विभाग– स्त्रीवादी लेखन : स्वरूप आणि विस्तार' असा आहे. स्त्री मुक्ती बद्दलचे विचार (अनसूया लिमये) मांडताना किंवा मतदानाच्या स्त्रियांच्या हक्काविषयी आपले विचार मांडताना स्त्रियांच्या जाणिवांविषयी या लेखिकांनी मांडलेले विचार मननीय आहेत. 'इस्लाम आणि स्त्रिया' सारखा लेख वाचताना तर स्त्रिया इतर धर्मांतील स्त्रियांविषयी त्यांच्या प्रश्नांकडे किती जागरूकतेने पाहत आहेत; आणि त्या बद्दलचे आपले विचार व्यक्त करताना किती अंतर्मुख होत आहेत; हे जाणवते. या विभागातील लेखांतून स्त्रियांना लेखनासाठी विविध दिशा गवसल्या आहेत, हे जाणवते. विविध सामाजिक स्तरांवर काम करताना स्त्रीवादी विचारांचा प्रसार करणे; वेगवेगळ्या माध्यमातून स्त्री प्रश्नांची दखल घेणे; ही प्रक्रिया सुरू झाली होती; ती महिलावर्षाच्या आसपास पुढील कालखंडात सांस्कृतिक पर्यावरणात झपाट्याने बदल होत गेली. स्त्री चळवळींचा वेग वाढला. या दृष्टीने स्त्रिया विविध पातळ्यांवर विचारशील कशा झाल्या हे 'समता आंदोलनाची परित्यक्ता चळवळ' (सौदामिनी राव), 'दलित स्त्रियांची संघटना वेगळी का झाली' (कुमुद पावडे) या विचारवंत स्त्रियांच्या लेखनाने स्पष्ट होते. या लेखांमुळे स्त्रीचळवळीचे या काळातील महत्त्व, स्त्री जागृतीचे संघटित प्रयत्न, आणि त्या विषयी स्त्रियांना आलेली जागृती, इ. चा दृश्य परिणाम या कालखंडात दिसून येतो. 'मुलगी झाली हो !' सारखे पथनाट्य किंवा 'फिरोजच्या निमित्ताने' सारखे लेख परिणामकारक ठरतात. स्त्री अभ्यासाची गरज म्हणा किंवा स्त्री अभ्यास केंद्राची गरज निर्माण झाली, ती स्वायत्ततेमधून. या दृष्टीने या ज्ञानशाखेविषयी आणि तिच्या स्वरूप व व्याप्तीविषयी

डॉ. विद्युत भागवत यांचा लेख दिशादर्शक आहे.

या कालखंडात स्त्रीलिखित समीक्षेचा विस्तार झालेला दिसतो. 'समीक्षा विविधा' या विभागातील कुसुमावती देशपांडे, डॉ. सरोजिनी वैद्य, डॉ. विजया राजाध्यक्ष, डॉ. अंजली सोमण, डॉ. अरुणा ढेरे, डॉ. नीलिमा गुंडी, डॉ. अश्विनी घोंगडे, यांचे लेख या दृष्टीने महत्त्वाचे आहेत. ललित लेखनाशिवाय स्त्रीने या कालखंडात वैचारिक समीक्षा लेखन करून वाङ्मयक्षेत्रातील आपले कर्तृत्व सिद्ध केले. स्वातंत्र्योत्तर कालखंडात एकूणच मराठी वाङ्मयातील समीक्षेचे क्षेत्र विस्तारले; त्याच्या शाखा विस्तारित झाल्या. वरील नावे पाहिली तर समीक्षा क्षेत्रातील स्त्रियांची एक फळीच निर्माण झालेली दिसते. चरित्रात्मक समीक्षा, आस्वादक समीक्षा, याखेरीज नव्याने रूढ झालेल्या आदिबंधात्मक समीक्षा (अरुणा ढेरे यांचा लेख) यांचा परामर्श त्या त्या लेखात आला आहे. स्त्रियांची अभ्यासवृत्ती, संशोधनवृत्ती, लेखनकर्तृत्व, या प्रातिनिधिक लेखांतून सिद्ध होते.

या कालखंडात स्त्रियांचे अनुवाद लेखनाचे प्रमाण वाढले. भारतीय भाषांतीलच नव्हे तर पाश्चात्य भाषांतील उत्तमोत्तम साहित्यकृतींचे अनुवाद स्त्रियांनी केले. आज अनेक स्त्रिया सातत्याने अनुवाद लेखन करताना दिसतात. त्यात लीना सोहोनी, मृणालिनी गडकरी, डॉ. उमा कुलकर्णी, धनश्री हळबे यांची नावे सुपरिचित आहेत. 'केल्याने भाषांतर' या विभागातील पहिले चार लेख जर्मन, रशियन, फ्रेंच, इंग्रजी भाषेतील आहेत. पाश्चात्य देशातील स्त्रीवादाशी संबंधित गोष्टींवर त्यातून प्रकाश पडतो. इतर लेखांमध्ये भारतीय स्त्रीजीवन, त्यांना मिळणारी प्रेरणा निर्माण झालेल्या समस्यांची स्त्रियांनी केलेली सोडवणूक इ. चे चित्र स्पष्ट होते. दिगंबरी देवी (बंगाली), तिरूमलाम्बा (कन्नड) के सरस्वती आम्मा (मल्याळी) या तत्कालीन प्रतिष्ठित लेखिकांचा परिचय लेखांतून होतो. भाषांतील साहित्य प्रवाह समजायच्या दृष्टीनेही लेख महत्त्वाचे ठरतात. ही निवड चांगली झाली आहे.

पाचवा भाग आहे— 'नव्या वाटा नवी वळणे' १९५० नंतरच्या स्त्रियांच्या कार्याच्या विविध दिशा या विभागातील लेखांतून दृग्गोचर होतात. संगीत, नाटक, चित्रपट, या क्षेत्रात स्त्रियांचं कर्तृत्व सिद्ध होत होतं. पण या खेरीज मॉडेलिंग, पत्रकारिता, वैद्यकीय क्षेत्रातही स्त्रिया स्थिर होत होत्या. आपापल्या क्षेत्रातील अनुभवाविषयी लिहू लागल्या. शिक्षणात नवे प्रयोग करण्यासाठी कोकणात गेलेल्या रेणू दांडेकर किंवा ध्येयवादाने झपाटलेल्या मेधा पाटकर, यांच्या आत्मकथनातून स्त्रियांच्या कर्तृत्वाची एक वेगळी दिशा मुखरित होते. विकसित होणारं स्त्रियांच्या कर्तृत्वाचं क्षितिज या लेखांतून विस्तारलं गेलं आहे.

'नवे क्षितिज' हा सहावा विभाग पाचव्या विभागाला बराचसा समांतर आहे. स्वातंत्र्योत्तर काळात स्त्रीला कर्तृत्वाच्या दाही दिशा खुल्या झाल्या. मनःपूत असलेल्या ओढीने कर्तृत्ववान स्त्रिया आपापल्या आवडत्या क्षेत्राकडे वळाल्या; त्या त्या क्षेत्रात त्यांनी स्वकर्तृत्व सिद्ध केलं. नृत्यविशारद रोहिणी भाटे, सुचेता भिडे-चाफेकर, डॉ. चित्रा नाईक, चित्रपट निर्मितीच्या क्षेत्रात अनेक नामांकन मिळविणाऱ्या सुमित्रा भावे, प्रशासकीय सेवेतील लीना मेहेंदळे, क्रीडा क्षेत्रातील शुभांगी कुलकर्णी, आजच्या आय.टी. क्षेत्रातील स्वाती सुखटणकर, तसेच नंदिनी जावळे यांच्या आत्मकथांत त्यांनी निवडलेल्या क्षेत्रातून त्याचं कार्य कसं फुललं हे सांगण्यास पुरेसं आहे.

स्वातंत्र्योत्तर काळातील 'स्त्री'च्या प्रगतीचा, तिच्या कर्तृत्वाचा, तिच्या विचारांचा, तिच्या पात्रतेचा विस्तारलेला आलेख या विविध लेखांतून सुस्पष्ट होतो. या बृहद् ग्रंथाचा उपयोग अभ्यासक, समाजशास्त्राचे अभ्यासक यांना निश्चितच होईल.

❖❖❖

**स्त्री विकासाचे नवे क्षितिज**
संपादक : डॉ. स्वाती कर्वे
प्रतिभा प्रकाशन, पुणे.
पृष्ठे - ८७२, मूल्य रु. ९००/-

**डॉ. मंदा खांडगे**
२४ ऋणानुबंध
डी. पी. रोड, औंध,
पुणे - ४११००७.



अनुक्रमणिका

□

# निवडक नवे...!

□

प्रा. मिलिंद जोशी

*ह्या अंकापासून 'निवडक नवे...!' हे सदर सुरू करीत आहोत. याद्वारे नव्याने पदार्पण केलेल्या ग्रंथांची तोंडओळख होईल; आणि दखलही घेतली जाईल. परिषदेकडे येणाऱ्या नित्य-नव्या पुस्तकांमधील 'निवडक नव्या' ग्रंथांचे स्वागत करणे हा यामागील हेतू आहे.*

**- संपादक**




## मुक्तागंण ते मुक्त विद्यापीठ

डॉ. प्र. ल. गावडे हे ज्येष्ठ शिक्षणतज्ज्ञ आहेत. त्यांचे शिक्षणासंबंधीचे समग्र चिंतन त्यांनी या पुस्तकात मांडले आहे. पुस्तकाबाहेरच्या जगाचा विद्यार्थ्यांना परिचय करून देणे हे शिक्षणाचे खरे काम; पण परीक्षा, गुण, प्रगतिपुस्तके यापलिकडे फारसे काही घडताना दिसत नाही. सर्जनशील विद्यार्थी घडविण्यासाठी कशा पद्धतीने प्रयत्न करता येऊ शकतात हे डॉ. प्र. ल. गावडे यांनी या पुस्तकात मांडले आहे. त्यांचे चिंतनशील लेख शिक्षणक्षेत्रातील सर्वांनाच नवी दृष्टी देणारे आहेत. मुलांच्या शाळेपासून स्वायत्त विद्यापीठांपर्यंत अनेक विषयांचा सूक्ष्म विचार या पुस्तकात आहे. शाळेतील शिक्षकांपासून ते महाविद्यालयातल्या प्राध्यापकांपर्यंत सर्व शिक्षणप्रेमींना उपयुक्त ठरेल असा हा ग्रंथ आहे.

(मुक्तांगण ते मुक्तविद्यापीठ - लेखक डॉ. प्र. ल. गावडे, नीलकंठ प्रकाशन, पुणे, पृष्ठे १४०, किंमत रु. १६०/-)




## भाषाभान

भाषा हे संवादाचे माध्यम इतक्या मर्यादित भूमिकेतून भाषेकडे पाहता येणार नाही. समाजात होणाऱ्या स्थित्यंतरांचा भाषेवर परिणाम होत असतो. बदलती भाषा जीवनव्यवहार व्यापून टाकत असते. भाषा, संस्कृती आणि समाजव्यवहार यांना केंद्रस्थानी ठेवून मराठीच्या व्यासंगी प्राध्यापिका डॉ. नीलिमा गुंडी यांनी 'भाषाभान' या पुस्तकात अभ्यासपूर्ण असे ललितलेख लिहिले आहेत. त्याचबरोबर भाषिक परंपरा आणि आजचे वास्तव यासंबंधीचे सखोल विवेचन या पुस्तकात आहे. डॉ. अशोक केळकर आणि डॉ. नागनाथ कोत्तापल्ले या दोन ज्येष्ठ अभ्यासकांच्या मुलाखती या पुस्तकात समाविष्ट आहेत. हे पुस्तक वाचकांना भाषेचे अनेक अंगाने भान देणारे आहे. (भाषाभान - डॉ. नीलिमा गुंडी - उन्मेष प्रकाशन, पुणे, पृष्ठे १७१, किंमत रु. १५०/-)




## शोधयोग

विज्ञानातले शोध मानवी जीवन समृद्ध करीत असतात. पण हा शोधांचा प्रवास साधा, सोपा कधीच नसतो. एकेका शोधासाठी शास्त्रज्ञांचे आयुष्य खर्ची पडते. अनेक शोध नाट्यमयरित्याही लागलेले आहेत. हा शोधांचा प्रवास शोधयोग या प्रदीप कुलकर्णी यांच्या पुस्तकात आहे. अतिशय ललितरम्यशैलीत त्यांनी लागलेले शोध उलगडून दाखविले आहेत. शास्त्रज्ञांच्या मनोरंजक कहाण्या सांगितल्या आहेत. या पुस्तकातून विज्ञानाच्या प्रगतीचा उंचावत जाणारा आलेख वाचकांसमोर येतो. सर्व प्रकारच्या वाचकांच्या जिज्ञासेची तृप्ती करीत विज्ञानाचा पाचसहाशे वर्षांचा इतिहास उलगडून दाखविणारे हे पुस्तक आहे. (शोधयोग - प्रदीप कुलकर्णी, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, पृष्ठे २२३, किंमत रु. १८०/-)

## गीतेचे समाजशास्त्र




गीता हा जगातला सर्वश्रेष्ठ ग्रंथ आहे. पाश्चात्य अभ्यासकांनाही या ग्रंथाचे आकर्षण वाटत आले आहे. मानवी जीवन कशा पद्धतीने समृद्ध करता येऊ शकेल याचे मार्गदर्शन गीतेत आहे. समाज हे गुणवत्तेचे उद्यान आहे; आणि व्यक्तिमत्त्व नावाचे मूल्य अधिक महत्त्वाचे आहे या भूमिकेतून जे अलौकिक ग्रंथ निर्माण झाले त्यापैकी एक गीता आहे. गीतेचे समाजशास्त्र डॉ. ग. ना. जोशी यांनी या पुस्तकात सांगितले आहे. अवघड वाटणारा हा विषय डॉ. जोशींनी अतिशय सोपा करून सांगितला आहे. गीतेसंदर्भात अनेक ग्रंथ यापूर्वी प्रसिद्ध झाले आहेत पण गीतेचे समाजशास्त्र उलगडून दाखविणारा हा ग्रंथ निश्चित वेगळा आहे.

(गीतेचे समाजशास्त्र - डॉ. ग. ना. जोशी - मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई - पृष्ठे १२९, किंमत - रु. १२०/-)




## एपिलेप्सीसहित जगताना

एपिलेप्सी हा मेंदूचा आजार. त्याचे मराठीतले नाव अपस्मार असे आहे. या आजारात रुग्णाला फिट्स येतात. या आजाराचा रुग्ण घरात असेल तर सारे घर चिंताक्रांत असते. पण शेवटी आजार स्वीकारून एका सकारात्मक भावनेने रुग्ण जगत राहिला तर अनेक गोष्टी टाळता येऊ शकतात. यासाठी महत्त्वाची गोष्ट म्हणजे या आजाराची पूर्ण माहिती करून घेणे, औषधोपचाराविषयी जाणून घेणे. त्यासंदर्भातले मार्गदर्शन कल्याणी गाडगीळ यांनी या पुस्तकात केलेले आहे. रुग्णाच्या नातेवाईकांनी करायची मदत, रुग्णांचे आर्थिक स्वावलंबन, स्वमदत गट अशा अनेक गोष्टींचा विचार या पुस्तकात आहे.

(एपिलेप्सीसहित जगताना - कल्याणी गाडगीळ, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ६२, किंमत रु. ६०/-)



अनुक्रमणिका




## उंच उंच आकाश

उंच उंच आकाश हा प्रा. चंद्रकांत वानखेडे यांचा पहिला कवितासंग्रह. ग्रामीण जीवनातले अस्वस्थायन कवीने आपल्या कवितेतून मांडले आहे. जागतिकीकरणानंतर खेडी उद्ध्वस्त झाली. भूमिपुत्रांची जमिनीशी असणारी नाळ तुटली. कधी निसर्गाने दगा दिला तर कधी व्यवस्थेने कंबरडे मोडले.त्यामुळे अन्नदात्या शेतकऱ्यावर आत्महत्येची वेळ आली. हे ग्रामीण जीवनातील वास्तव कवितेच्या केंद्रस्थानी आहे. या कवितेत कुठेही ऊरबडवेपणा नाही. आक्रोश नाही. प्रस्थापित व्यवस्थेविषयी आकस नाही. अनुभवांतून शहाणे होऊन आकाशाकडे झेप घेण्याची जिद्द आहे. नव्या बदलांची स्पंदने अचूकपणे टिपणारा हा कवितासंग्रह आहे.

(उंच उंच आकाश - प्रा. चंद्रकांत वानखेडे, महाराष्ट्र साहित्य कला प्रसारिणी सभा, पुणे, पृष्ठे १२०, किंमत रु. १००/-)

## एका स्वागताध्यक्षाची डायरी




सांगली येथे भरलेल्या ८१व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे स्वागताध्यक्षपद ज्येष्ठ पत्रकार आणि साहित्यिक उत्तम कांबळे यांनी भूषविले. उपमुख्यमंत्री आर.आर.पाटील यांनी त्यांच्या निवडीची घोषणा केली; तेव्हा महाराष्ट्रात अनेक प्रकारच्या प्रतिक्रिया उमटल्या. खुद्द उत्तम कांबळे यांना त्यांची निवड झाल्याची बातमी प्रसारमाध्यमातल्या मंडळींकडून समजली. तेव्हापासून ते संमेलन पार पडेपर्यंत अनेक नाट्यमय गोष्टी घडल्या. डायरी लिहिण्याची सवय असणाऱ्या उत्तम कांबळे यांनी त्यांच्या नोंदी केल्या. त्या नोंदीची डायरी खूप काही सांगणारी आहे. कुठेही कटुता न येऊ देता माणसं आणि व्यवस्था या संदर्भातली आपली निरीक्षणं कांबळेंनी नोंदविली आहेत. त्यातून माणसं आणि एकूणच वाङ्मयव्यवहार उलगडत जातो. त्यामुळे उत्तम कांबळेंच्या डायरीतील नोंदी त्यांच्या वैयक्तिक नोंदी राहत नाहीत. त्याला सामाजिक संदर्भ प्राप्त होतो. या नोंदी जशा वाचकांना धक्के देणाऱ्या आहेत तशाच त्यांना अंतर्मुखही करणाऱ्या आहेत.

(एका स्वागताध्यक्षाची डायरी - उत्तम कांबळे लोकवाङ्मय गृह, मुंबई - पृष्ठे १३४, किंमत - रु. १७०/-)




## स्वगत

स्वगत हे ज्येष्ठ व्यवस्थापन शास्त्रतज्ज्ञ डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांचे आत्मकथन आहे. पुण्यात व्यवस्थापन शिक्षणाच्या कामी पहिला चिरा डॉ. शेजवलकरांनी रचला. त्यांनी आपल्या आयुष्याची उभारणी मोठ्या कष्टातून केली. शिक्षणक्षेत्रात नव्या वाटा निर्माण केल्या. त्यासाठी धाडसी प्रयोग केले. ज्यावेळी 'स्वायत्त' हा शब्द लोकांना मानवणारा नव्हता

त्यावेळी व्यवस्थापनशास्त्राच्या शिक्षणासाठी स्वायत्त शिक्षणसंस्था निर्माण केली. कर्तृत्वसंपन्न विद्यार्थ्यांच्या अनेक पिढ्या घडविल्या संशोधनात मग्न असतानाही अनेक सामाजिक, साहित्यिक संस्थांसाठी वेळ दिला. अशा या 'मॅनेजमेंट गुरू'ची वाटचाल या पुस्तकात आहे. डॉ. शेजवलकरांचा जन्म स्वातंत्र्यपूर्व काळातला आणि स्वातंत्र्य मिळाल्यानंतरचे बदलही त्यांनी पाहिले आहेत. त्यामुळे त्यांच्या या आत्मकथनाकडे त्यांच्या आयुष्यातील आठवणींचा पट इतक्या मर्यादित भूमिकेतून पाहता येणार नाही. स्वातंत्र्योत्तर कालखंडात झालेली सामाजिक, राजकीय, शैक्षणिक, सांस्कृतिक क्षेत्रातील स्थित्यंतरे त्यांच्या आत्मकथनात अधोरेखित झालेली आहेत.

(स्वगत- डॉ. प्र. चिं. शेजवलकर, 'संस्कृती प्रकाशन', पुणे - पृष्ठे १२६, किंमत रु. ११०/-)

### दारातल्या रांगोळीचे रंग




डॉ. सिसिलिया काव्हीलो यांनी उन्मेष, अंतर्यामी, सूर्य किरणात आला, पंख या सारख्या कवितासंग्रहातून आपल्या काव्यप्रतिभेची वेगळी मोहोर उमटविलेली आहे. त्यांचा 'दारातल्या रांगोळीचे रंग' हा नवा कवितासंग्रह वर्तमानातील प्रखर वास्तव मांडणारा आहे. रांगोळी हे भारतीय संस्कृतीतले मांगल्याचे प्रतीक. पण जगण्याच्या कोलाहलात माणसाची संवेदनशीलता हरवत चालली आहे. भावना बोथट होत चालल्या आहेत याची खंत या काव्यसंग्रहात कवयित्रीने मांडली आहे. दारातल्या रांगोळीचे रंग फिकट होत चालले आहेत. त्याला कधी धर्म, कधी भय, कधी विचारशून्य कृती, कधी कोशात जगणे कारणीभूत ठरले आहे. त्यातून माणसांची ओळख पुसली जात आहे. हे सारे कवयित्रीने नेमक्या शब्दात पकडले आहे. या काव्यसंग्रहाला डॉ. विजया राजाध्यक्ष यांची प्रस्तावना लाभली आहे. वाचकांना हलवून टाकणाऱ्या या कविता आहेत.

(दारातल्या रांगोळीचे रंग - सिसिलिया काव्हीलो, शलाका प्रकाशन, वसई, पृष्ठे ९०, किंमत रु. १००/-)

### मालविका




'मालविका' हा विश्वास वसेकर यांचा नवा कवितासंग्रह. एक अनवट प्रेम कहाणी या कवितासंग्रहातून वाचकांसमोर येते. प्रेमात केवळ प्रेयसीशी संवाद असतो. या कवितासंग्रहाचे वैशिष्ट्य असे की, प्रेयसी बरोबरच्या संवादाबरोबरच या कवितांमध्ये आत्मसंवादही आहे. आत्मसंवादातून फुलत जाणाऱ्या प्रीतीचे एक वेगळे रूप या कवितांमध्ये दिसते. प्रेमातून माणसांना नवी ऊर्जा, उभारी मिळत असते. अनेकदा त्याच्याच धुंदीत माणसं वाहवत जातात. या कवितेतला प्रेमरंग कवीला जगण्याची प्रगल्भ जाणीव देतो. जीवनातल्या ताणतणावाची प्रेमावरती पडणारी छाया या कवितेतून प्रकर्षाने पुढे आलेली आहे. या प्रेमकवितांना एकच एक रंग नाही. सप्तरंगी इंद्रधनुष्याची आठवण करून देणाऱ्या या प्रेम कविता आहेत.

(मालविका - विश्वास वसेकर - स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, पृष्ठे ११०, किंमत रु. १००/-)

### मादाम क्युरी

मादाम क्युरी या पुस्तकात माधुरी काळे यांनी पोलोनियम आणि रेडियम या दोन किरणोत्सारी मूलद्रव्यांचा शोध लावणाऱ्या आणि न्यूक्लिअर फिजिक्सचा



अनुक्रमणिका




पाया रोवणाऱ्या मादाम क्युरी यांची चरित्रकहाणी सांगितली आहे. ती अतिशय प्रेरणादायी आहे. मादाम क्युरींनी शून्यातून विश्व उभे केले. आर्थिक परिस्थिती बेताची त्यामुळे त्यांना वयाच्या १८व्या वर्षी क्षुल्लक नोकरी करावी लागली. पण त्यांनी जिद्द सोडली नाही. पंधरा सुवर्णपदके, एकोणीस पदव्या आणि नोबेल पुरस्कार मिळविणाऱ्या मादाम क्युरींची ही जीवनकहाणी वाचकांना खिळवून ठेवणारी आहे. या चरित्रग्रंथात छायाचित्रांचा समावेश केल्यामुळे तो परिपूर्ण झाला आहे. (मादाम क्युरी - माधुरी काळे, मॅजेस्टीक प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ३०५, किंमत रु. २५०/-)

### मातृत्वाची आस




मातृत्वामुळेच स्त्रीजीवनाला पूर्णत्व प्राप्त होते अशा समजुतीखाली अजूनही प्रगत समजला जाणारा समाज आहे. अनेकदा उभयतांमध्ये कोणताही दोष नसताना देखील अपत्यप्राप्ती होत नाही. विज्ञान तंत्रज्ञानाच्या सहाय्याने या अडचणींवर मात करून मातृत्वाची आस पुरी करता येऊ शकते असा संदेश जयश्री थत्ते-भट यांनी मातृत्वाची आस या कादंबरीतून दिला आहे. कल्पना विलासात न रमता शास्त्रीय आधारावर या कादंबरीची निर्मिती झालेली आहे. ज्ञान, विज्ञान आणि तत्त्वज्ञान यांचा सुंदर मिलाफ या कादंबरीत आहे. मानवी मनाचे हळवेपणही या कादंबरीत प्रभावीपणे आले आहे.

(मातृत्वाची आस - जयश्री थत्ते-भट, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १६९, किंमत रु. १५०/-)

### आठवणींचा बटवडा




श्री. द. भा. करंदीकर यांनी अडतीस वर्षांहून अधिक काळ पोस्टखात्यात विविध पदांवर सेवा केली. त्या काळातील आठवणी त्यांनी या पुस्तकात शब्दबद्ध केलेल्या आहेत. या आठवणीतून संपूर्ण पोस्टखाते उलगडत जाते. पोस्टखात्यात कार्यरत असताना त्यांना भेटलेली नानाविध प्रकारची माणसं तिथल्या अंतर्गत समस्या, त्यावर त्यांनी शोधलेले उपाय आणि अनेक गमतीदार प्रसंग या साऱ्यांची अतिशय सुंदर अशी गुंफण या पुस्तकात आहे. त्यातून पोस्टखात्याविषयीच्या कितीतरी नव्या गोष्टी वाचकांना समजतात. या लेखनात प्रांजळता आहे. एका प्रामाणिक माणसांच्या आठवणींचा हा संग्रह वाचकांना भावणारा आहे.

(आठवणींचा बटवडा - द. भा. खरंदीकर, पुष्पक प्रकाशन, पुणे, पृष्ठे १९९, किंमत रु. २००/-)

❖❖❖

**प्रा. मिलिंद जोशी**
बी१-१२, रविराज टेरेस, सुखसागरनगर, कात्रज, पुणे ४११ ०४६.
दूरभाष : (०२०) २६९६३५०९, ९८५०२७०८२३

## कार्यवृत्त नोंद
(०१ मार्च २००८ ते ३१ मे २००८)

डॉ. माधवी वैद्य, प्रमुख कार्यवाह

**५ मार्च २००८ : कॉफी क्लब :**

'वॉटर' चित्रपटातील प्रसिद्ध अभिनेत्री विदुला जवळगेकर यांनी 'वॉटर' चित्रपटासंबंधातील आपले अनुभव कथन केले नंतर कॉफीपान झाले.

**८ मार्च २००८ : युवा मंच तर्फे "गझल मुशायरा" :**

परिषदेच्या युवा मुक्त मंचातर्फे स्वरचित मराठी गझल सादरी करणाचा कार्यक्रम सादर करण्यात आला. हर्षल चव्हाण यांनी प्रास्ताविक, तर संदीप बर्वे यांनी उपस्थितांचे स्वागत केले. महेंद्र मुंजाळ यांनी आभार मानले. वैभव जोशी, प्रसाद शिरगावकर, कुमार जावडेकर, आश्विन जावडेकर यांनी गझला सादर केल्या व नचिकेत जोशी यांनी निवेदन केले.

**१० मार्च २००८ :**

दिवाळी अंक स्पर्धा २००७ पारितोषिक वितरण समारंभ अध्यक्ष श्री. ह. मो. मराठे यांच्या उपस्थितीत साजरा झाला. 'मी वाचलेल्या दिवाळी अंक २००७ मधील १५० कथा : एक दृष्टिक्षेप' या विषयावर त्यांचे भाषण झाले. प्रास्ताविक व स्वागत कोषाध्यक्ष श्री. ह. ल. निपुणगे यांनी केले. डॉ. वि. भा. देशपांडे, डॉ. माधवी वैद्य यांच्या हस्ते अध्यक्ष मराठे व स्पर्धापरीक्षक डॉ. कल्याणी दिवेकर व श्रीमती रागिणी पुंडलीक यांचे सत्कार करण्यात आले. परीक्षकांचे मनोगत डॉ. कल्याणी दिवेकर यांनी व्यक्त केले. आभार प्रदर्शन व सूत्र संचालन कार्यवाह ॲड. प्रमोद आडकर यांनी केले.

(दिवाळी अंक २००७ च्या पारितोषिकांचा सविस्तर निर्णय पुढे दिला आहे.)

**१३ मार्च २००८ :**

महाराष्ट्रकवी यशवंत पुरस्कार वितरण समारंभ अध्यक्षा प्रसिद्ध कवयित्री सरिता पदकी यांच्या उपस्थितीत झाला. स्वागत स्वाती महाळंक यांनी केले. सौ. चारूता पेंढरकर यांनी कवी यशवंतांची "सांजवात" ही कविता सादर केली. प्रास्ताविक डॉ. माधवी वैद्य यांनी केले. काशीताई पेंढरकर यांचा सत्कार करण्यात आला. परीक्षक सौ. अंजली कुलकर्णी यांनी मनोगत व्यक्त केले.

कवी डॉ. दिलीप कुलकर्णी यांच्या 'उघडीप' या काव्यसंग्रहास अध्यक्ष सरिता पदकी यांच्या हस्ते महाराष्ट्र कवी यशवंत यांच्या नावाने दिला जाणारा पुरस्कार प्रदान केला. डॉ. दिलीप कुलकर्णी यांनी आपले मनोगत व्यक्त केले. विशेष म्हणजे डॉ. दिलीप कुलकर्णी यांनाच कविश्रेष्ठ कुसुमाग्रज यांच्या नावे दिला जाणारा म. सा. परिषदेचा पुरस्कार यापूर्वीच मिळाला आहे. डॉ. दिलीप कुलकर्णी यांचा परिचय दीपक करंदीकर यांनी करून दिला तर अध्यक्ष सरिता पदकी यांचा परिचय डॉ. कल्याणी दिवेकर यांनी करून दिला. 'रविकिरण मंडळ आणि यशवंतांची कविता' या विषयावर सरिता पदकी यांचे व्याख्यान झाले.

**१९ मार्च २००८ :**

**'कॉफी क्लब' :**

यावेळच्या कॉफी क्लबच्या गप्पांमध्ये ज्येष्ठ साहित्यिक म. श्री. दीक्षित यांच्याशी गप्पा झाल्या. नंतर कॉफीपान झाले. रूपांतर, भाषांतर व प्रकाशन इत्यादी क्षेत्रातील आपले अनुभव त्यांनी सांगितले.



अनुक्रमणिका

**२९ मार्च २००८ :**

**शं. ना. जोशी पुरस्कार वितरण समारंभ :**

स्वाती महाळंक यांनी स्वागत व सूत्रसंचालन केले. कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी प्रास्ताविक केले. डॉ. सतीश देसाई यांनी समारंभाचे अध्यक्ष डॉ. प्र. ल. गावडे यांचा परिचय करून दिला.

डॉ. वि. भा. देशपांडे यांच्या हस्ते अध्यक्षांचा सत्कार करण्यात आला. दोन्ही परीक्षक डॉ. न. म. जोशी व म. श्री. दीक्षित यांचे सत्कार प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य यांच्या हस्ते करण्यात आले. कै. शं. ना. जोशी यांच्या विषयीच्या आठवणी श्री. ब. शं. जोशी यांनी कथन केल्या. डॉ. न. म. जोशी यांनी परीक्षकांचे मनोगत व्यक्त केले. 'शिक्षण विचार' हा ग्रंथ प्रकाशित करणाऱ्या प्रकाशनसंस्थेचे डॉ. अल्बर्ट डिसोझा (शिक्षण मंडळ, कऱ्हाड) यांनी आपले मनोगत व्यक्त केले. कोषाध्यक्ष श्री. ह. ल. निपुणगे यांनी पुरस्कार प्राप्त डॉ. य. गो. प्रभुणे यांचा परिचय करून दिला. अध्यक्ष थोर शिक्षण तज्ज्ञ डॉ. प्र. ल. गावडे यांच्या हस्ते डॉ. रा. गो. प्रभुणे यांना पुरस्कार प्रदान करण्यात आला. त्यांनी पुरस्काराविषयी आपले मनोगत व्यक्त केले. डॉ. गावडे यांचे व्याख्यान झाले. दीपक करंदीकर यांनी आभार मानले. 'शिक्षण विचार' या ग्रंथाचे ग्रंथकर्ते डॉ. रा. गो. प्रभुणे यांची कुटुंबिय मंडळी व अनेक मान्यवर यांची या समारंभास विशेष उपस्थिती होती. कै. शं. ना. जोशी यांच्या

## दिवाळी अंक स्पर्धा २००७

### परीक्षकांचा निर्णय

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या या वर्षीच्या दिवाळी अंक २००७ च्या स्पर्धेसाठी ७५ अंक आले. या स्पर्धेचा निकाल सर्व परीक्षकांनी एकमताने दिला आहे.

१) अ. स. गोखले स्मृत्यर्थ 'रत्नाकर' पारितोषिक — रु. १००१/-
अंक : पुरुष स्पंदन — संपादक : दीपक पवार व हरीश सदानी

श्री. चंद्रकांत शेवाळे (संपादक - ग्रहांकित) पुरस्कृत तीन पारितोषिके

२) विविध ज्ञानविस्तारकर्ते 'रावसाहेब मोरमकर' पारितोषिक — रु. १०००/-
अंक : आपले छंद — संपादक : दिनकर शिलेदार

३) मासिक मनोरंजनकार 'का. र. मित्र' पारितोषिक — रु. १०००/-
अंक : पत्रिका (मराठी विज्ञान परिषद) — संपादक : गजानन वामनाचार्य आणि इतर

४) शं. वा. किर्लोस्कर यांच्या स्मरणार्थ पारितोषिक (विभागून) — रु. १०००/-
१) अंक : कल्पक निवड — संपादक : सुधीर चव्हाण
२) अंक : ह ळ क्ष ज्ञ — संपादक : मुकुंद कुळे

५) उत्कृष्ट कथेचे 'दि. अ. सोनटक्के पारितोषिक — रु. ५००/-
कथा : 'अंतर' — लेखक : मधुकर धर्मापुरीकर
अंक : लोकसत्ता — संपादक : कुमार केतकर

६) उत्कृष्ट ललितलेखासाठी 'अनंत काणेकर' पारितोषिक — रु. २००/-
लेख : 'गांधी' — लेखक : यशवंत रांजणकर
अंक : अंतर्नाद — संपादक : भानू काळे

७) बाल विभागासाठी विशेष पारितोषिक (कै. जानकीबाई केळकर यांच्या स्मरणार्थ) — रु. २००/-
अंक : पालकनीती — संपादक : संजीवनी कुलकर्णी

या दिवाळी अंक स्पर्धेचा पारितोषिक वितरण समारंभ सोमवार, दि. १० मार्च २००८ रोजी सायंकाळी ६ वाजता श्री. ह. मो. मराठे यांच्या शुभहस्ते म. सा. परिषदेच्या माधवराव पटवर्धन सभागृहात आयोजित करण्यात आला.

चिरंजीवांनी पुरस्काराच्या देणगीत रु. ६०,०००/- ची वाढ जाहीर केली.

**२ एप्रिल २००८ :**

**'कॉफी क्लब' :**

रवींद्र गुर्जर यांच्याशी कॉफी क्लबच्या सदस्यांनी अनुवाद, रूपांतर, भाषांतर या विषयांवर व पुस्तकाच्या क्षेत्रातील एकूण व्यवहारावर गप्पा मारल्या. 'पॅपिलॉन' या गाजलेल्या पुस्तकाचे लेखक या नात्याने सर्व परिचित असलेला हा लेखक परिषदेच्या व्यासपीठावर प्रथमच आला. कॉफीचा आस्वाद घेत त्यांच्याशी गप्पांची मैफील रंगली. प्रत्येक महिन्याच्या पहिल्या व तिसऱ्या बुधवारी सायं. ५ ते ६ परिषदेच्या पटवर्धन सभागृहात ह्या कॉफी क्लबचे सभासद अनौपचारिकपणे एकत्र येतात. दरमहा रुपये ५०/- वर्गणी भरून सभासद होता येते.

**१० एप्रिल २००८ :**

ज्ञानकोशकार श्री. व्यं. केतकर स्मृतिदिन : दरवर्षीप्रमाणे यंदाही सकाळी आठ वाजता पुण्यातील कमला नेहरू उद्यानातील केतकरांच्या समाधी स्थळास पुणेकरांनी पुष्पहार व फुले अर्पण केली. परिषदेच्या पदाधिकाऱ्यांपैकी डॉ. वि. भा. देशपांडे, डॉ. माधवी वैद्य, नंदा सुर्वे, प्रा. मिलिंद जोशी, स्वाती महाळंक, डॉ. सतीश देसाई, श्री. ह. ल. निपुणगे व कार्यालयीन सेवक उपस्थित होते. तेथेच पेढे वाटप कार्यक्रम झाला. त्याचदिवशी सायंकाळी डॉ. मो. गो. धडफळे यांचे 'कोशनिधीकार केतकर' या विषयावर व्याख्यान झाले. सूत्रसंचालन स्थानिक कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी केले. डॉ. वि. भा. देशपांडे यांनी प्रास्ताविक केले.

**दि. १५ एप्रिल २००८ :**

प्रा. न. र. फाटक पुरस्कार वितरण समारंभ : मराठी वाङ्मयाच्या पुरातत्त्व विभागात केलेल्या गुणवत्तापूर्ण लेखनाबद्दल व संशोधनाबद्दल प्रा. न. र. फाटक यांच्या नावे दिला जाणारा हा पुरस्कार डॉ. गो. बं. देगलूरकर यांना अध्यक्ष डॉ. सरोजा भाटे यांच्या हस्ते दिला गेला. डॉ. गो. बं. देगलूरकर यांच्याविषयी त्यांच्या शिष्या डॉ. भाग्यश्री पाटसकर यांनी आपले मार्मिक विचार प्रकट केले. स्वागत व सूत्रसंचालन कार्यवाह स्वाती महाळंक यांनी केले, आभार दीपक करंदीकर यांनी मानले. डॉ. माधवी वैद्य यांनी प्रास्तविक केले. प्रा. मिलिंद जोशी यांनी डॉ. देगलूरकर यांचा परिचय करून दिला.

**१९ एप्रिल २००८ :**

डॉ. अरविंद लेले यांनी दिलेल्या देणगीतून दरवर्षी एक व्याख्यान आयोजित करण्यात येते. परिषदेच्या युवा मुक्तमंच तर्फे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या जयंतीनिमित्त 'आंबेडकरांची पत्रकरिता' याविषयावर प्रा. गणेश राऊत यांचे व्याख्यान झाले. महेंद्र मुंजाळ यांनी सूत्रसंचालन केले. संदीप बर्वे यांनी वक्त्यांचा परिचय करून दिला.

**२६ एप्रिल २००८ : 'कॉफी क्लब' :**

आजचे पाहुणे प्रसिद्ध साहित्यिक डॉ. न. म.जोशी होते. जोशी सरांशी साहित्यिक, शैक्षणिक क्षेत्रांतील त्यांच्या अनुभवाविषयी उपस्थितांशी गप्पा झाल्या. नंतर कॉफीचा आस्वाद घेण्यात आला.

**२६ एप्रिल २००८ : नवं कोरं :**

या परिषदेने सुरू केलेल्या अभिनव उपक्रमांतर्गत मोनिका गर्जेंद्रगडकर यांच्या 'आर्त' या कथासंग्रहाचे स्वागत व प्रास्ताविक परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. वि. भा.देशपांडे यांनी केले. सूत्रसंचालन व आभार प्रदर्शन नंदा सुर्वे यांनी केले. 'आर्त' मधील काही कथांचे वाचन डॉ. वृषाली पटवर्धन, अन्वय बेंद्रे यांनी केले. डॉ. अरुणा ढेरे व प्रा. मिलिंद जोशी यांनी आपले विचार प्रकट केले. साहिल पुंडलीक यांनी 'पसायदान' गायिले. हा कार्यक्रम परिषद व मौज प्रकाशन गृह मुंबई यांच्या संयुक्त सहकार्याने झाला. गर्जेंद्रगडकर यांनी लेखिकेचे मनोगत सादर केले.

**७ मे २००८ : 'कॉफी क्लब' :**

म. सा. परिषदेचे कोषाध्यक्ष व प्रकाशक श्री. ह. ल. निपुणगे यांनी स्वतःचा जीवनप्रवास अतिशय मनमोकळ्या पद्धतीने उलगडून दाखविला. श्री. ह. ल. निपुणगे यांनी ७१व्या वर्षात पर्दापण केल्यानिमित्त प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य यांच्या हस्ते त्यांचा सत्कार करण्यात आला. नंतर कॉफीपान झाले.

**२१ मे २००८ :**

**नाट्यविभाग :**

परिषदेने नव्याने सुरू केलेल्या नाट्यविभागातर्फे पुण्यातील सुदर्शन रंगमंचावर नाट्यविभागाच्या कलाकारांनी 'मांजरसुंभ्याच्या फाट्यावरून' हे श्री. दिवाकर पांडे यांनी लिहिलेले नाटक नाट्यविभागाच्या विद्यार्थ्यांनी सादर केले. परिषदेच्या १०२ वर्षांच्या इतिहासातील ही अशा प्रकारची पहिलीच घटना ठरली.

**२१ मे २००८ : 'कॉफी क्लब' :**

परिषदेचे ग्रंथालय विभागप्रमुख अनंत जोशी यांच्या ७१व्या वर्षानिमित्त त्यांना श्रीफल देऊन त्यांचा सत्कार करण्यात आला. 'ग्रंथालये व ग्रंथालय व्यवस्थापन' ह्या क्षेत्रातील आपल्या प्रदीर्घ अनुभवांचे कथन श्री. अनंत जोशी यांनी केले. नंतर कॉफीपान झाले.

**२६ मे २००८ : वार्षिक पारितोषिक वितरण समारंभ :**

सूत्रसंचालन नंदा सुर्वे यांनी केले. गौरी गोळे यांनी शारदा स्तवन म्हटले. डॉ. वि. भा. देशपांडे यांनी प्रास्ताविक केले. स्वागत डॉ. माधवी वैद्य यांनी केले. अध्यक्ष डॉ. विजय भटकर यांचा श्रीफल, गुच्छ व स्मृतिचिन्ह देऊन कार्याध्यक्षांच्या हस्ते सत्कार करण्यात आला. अध्यक्ष प्रा. द. मा. मिरासदार यांचा सत्कार श्री. ह. ल. निपुणगे यांनी केला. परिषदेतर्फे घेण्यात येणाऱ्या परिक्षांचा निकाल डॉ. कल्याणी दिवेकर यांनी जाहीर केला. यशस्वी परीक्षार्थ्यांना प्रा. द. मा. मिरासदार यांच्या हस्ते विविध पारितोषिके देण्यात आली. डॉ. विजय भटकर यांच्या हस्ते ग्रंथकार व ग्रंथपुरस्कार विविध व्यक्तींना समारंभपूर्वक प्रदान करण्यात आले. डॉ. अशोक कामत व प्रवीण दवणे यांनी पारितोषिक विजेते म्हणून मनोगते व्यक्त केली. डॉ. विजय भटकर यांनी अध्यक्षीय विचार प्रकट केले. प्रा. द. मा. मिरासदार यांनी समारोप केला. अॅड. प्रमोद आडकर यांनी आभार मानले. कार्यक्रमाअगोदर निमंत्रित / देणगीदार / हितचिंतक / पारितोषिके प्राप्त व्यक्ती यांचे एकत्रित अल्पोपहार व पेयपान आयोजित करण्यात आले.

**महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या परीक्षांचे निकाल जाहीर:**

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांच्यातर्फे फेब्रुवारी २००८ मध्ये घेण्यात आलेल्या प्रथमा, प्रवेश, साहित्य प्राज्ञ व साहित्य विशारद या परीक्षांचे निकाल जाहीर झाले असून विशारद परीक्षेत सायली गोडबोले ही पुण्याची विद्यार्थिनी प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण झाली आहे. साहित्य प्राज्ञ परीक्षेत कु. मयुरी उत्तमराव शेळके ही शारदाबाई पवार महिला महाविद्यालय बारामतीची विद्यार्थिनी प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण झाली आहे. प्रवेश परीक्षेत प्रथम क्रमांक रोहित शेलार या विद्याप्रतिष्ठान बालविकास मंदिर बारामतीच्या विद्यार्थ्याने पटकाविला असून प्रथमा परीक्षेत कल्पेश बागमार हा सासवड येथील म.ए.सो.च्या वाघिरे विद्यालयाचा विद्यार्थी सर्वप्रथम आला आहे.

**२७ मे २००८ : परिषदेचा वर्धापन दिन सोहळा :**

'स्त्रियांचे कथालेखन एका शतकाचा उत्क्रांतीमार्ग' (१८९५ ते २००५) हा दृकश्राव्य पद्धतीचा कार्यक्रम सौ. वंदना बोकील-कुलकर्णी यांनी सादर केला. स्वाती महाळंक यांनी सूत्रसंचालन केले. डॉ. माधवी वैद्य यांच्या हस्ते सौ. बोकील कुलकर्णी यांचा सत्कार करण्यात आला. डॉ. सतीश देसाई यांनी आभार मानले. शतकातील कथालेखिकांच्या कार्याचा आढावा घेणारा हा कार्यक्रम लक्षवेधी ठरला.

नंतर मुख्य वर्धापन दिनाचा कार्यक्रम सोहळा सुरू झाला. गौरी गोळे यांनी सरस्वती वंदना सादर केली. सूत्रसंचालन डॉ. पुरुषोत्तम काळे यांनी केले. स्वागत व प्रास्ताविक डॉ. माधवी वैद्य व डॉ. वि. भा. देशपांडे यांनी केले. मधू नेने, डॉ. किसन पाटील व रामचंद्र शिंदे यांचे सत्कार करण्यात आले. अनुक्रमे महामंडळावर प्रतिनिधी व परिषदेचे बाहेरगावचे प्रतिनिधी म्हणून हे सत्कार झाले. डॉ. मु. श्री. कानडे व श्री. पं. ग. कुलकर्णी (बेळगाव) यांचे परिचय अनंत जोशी व ह. ल. निपुणगे यांनी करून दिले. डॉ. मु. श्री. कानडे यांचा सत्कार मसाप गौरव

**परीक्षेचा निकाल**

| | | | |
|---|---|---|---|
| साहित्य विशारद : | प्रथम क्रमांक - | सायली गोडबोले, पुणे. | रु. २५०/- पारितोषिक |
| साहित्य प्राज्ञ : | प्रथम क्रमांक - | मयुरी शेळके, बारामती. | रु. २५०/- पारितोषिक |
| प्रवेश : | प्रथम क्रमांक - | रोहित शेलार, बारामती. | रु. २५०/- पारितोषिक |
| | द्वितीय क्रमांक - | सोनिया शहा, बारामती. | रु. २००/- पारितोषिक |
| | तृतीय क्रमांक - | मधुरा केतकर, डोंबिवली. | रु. १५०/- पारितोषिक |
| प्रथमा : | प्रथम क्रमांक - | कल्पेश बागमार, सासवड. | रु. २५०/- पारितोषिक |
| | द्वितीय क्रमांक - | नम्रता कुचेकर, बारामती. | रु. २००/- पारितोषिक |
| | तृतीय क्रमांक - | संकेत भिरंगी, सासवड. | रु. १५०/- पारितोषिक |



अनुक्रमणिका

पुरस्कार देऊन व पी. जी. कुलकर्णी यांचा सत्कार डॉ. भीमराव कुलकर्णी मसाप कार्यकर्ता पुरस्कार देऊन समारंभाचे प्रमुख पाहुणे फादर फ्रान्सिस दिब्रेटो यांच्या हस्ते करण्यात आला. पुरस्कार विजेत्यांनी मनोगते व्यक्त केली. डॉ. सु. प्र. कुलकर्णी यांनी फादर फ्रान्सिस दिब्रेटो यांचा वेधक भाषेत परिचय करून दिल्यावर फादर दिब्रेटो यांचे 'मराठी समाज आणि साहित्य संस्था' या विषयावर भाषण झाले. प्रा. द. मा. मिरासदार यांनी समारोप केला. पद्माकर कुलकर्णी यांनी आभार मानले व प्रा. वैजयंती चिपळूणकर यांनी पसायदान सादर केले.

याच कालावधीत १० मे २००८ परिषदेच्या नाट्यविभागातर्फे नाट्यकार्यशाळा व इतर कार्यशाळांचे आयोजन करण्यात आले होते.

**(नोंद : दीपक करंदीकर)**

---

## शाखावृत्त

### इस्लामपूर शाखा

**२३ मे २००७ :**

**मधु कुलकर्णी स्मृतिदिनः**

शनिवार, दि. २३ मे २००७ रोजी येथील प्रसिद्ध कलाकार डॉ. मधुकर कुलकर्णी स्मृतिदिनानिमित्त प्रा. सुभाष खोत यांच्या कथाकथनाचा कार्यक्रम आयोजित केला होता. त्यांनी 'नाटक' नावाची कथा सांगितली.

**५ जून २००७ :**

**शाखा वर्धापन दिन :**

इस्लामपूर शाखेचा वर्धापन दिन दि. ५ जून २००७ रोजी साजरा करण्यात आला. परिषदेचे आजी व सदस्य प्राचार्य आर. डी. सावंत यांचा कासेगाव शिक्षण संस्थेच्या सचिवपदी नियुक्ती झाल्याबद्दल सत्कार करण्यात आला.

**१४ जुलै २००७ :**

**प्राचार्य शरद भोसले स्मृतिदिन :**

म.सा.प. चे माजी अध्यक्ष प्राचार्य शरद भोसले यांच्या स्मृतिदिनाच्या निमित्ताने श्री. प्रकाश दामोदरे, पुणे यांचे ''दैनंदिन जीवनात भगवत्‌गीता'' या विषयावर व्याख्यान आयोजित केले होते.

**डॉ. गं. ना. जोगळेकर यांना श्रद्धांजली :**

मराठी भाषेचे गाढे अभ्यासक म.सा.प. पुणेचे कार्याध्यक्ष व साहित्य महामंडळाचे माजी अध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांचे निधन झाले. त्यांना श्रद्धांजली वाहण्यात आली.

**डॉ. शिवाजीराव घोरपडे स्मृतिदिन :**

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे माजी सदस्य डॉ. शिवाजीराव घोरपडे यांच्या स्मृतिदिनानिमित्त ''असे रोग असे रुग्ण'' या विषयावर डॉ. अमोल मडके यांचे व्याख्यान आयोजित केले होते.

**१० डिसेंबर २००७ :**

**आचार्य जावडेकर स्मृतिदिन :**

महाराष्ट्रातील एक थोर विचारवंत अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे माजी अध्यक्ष निर्भिड पत्रकार ज्येष्ठ स्वातंत्र्यसेनानी व 'आधुनिक भारत' या ग्रंथाचे लेखक आचार्य शंकरराव जावडेकर यांच्या स्मृतिदिनानिमित्त मा. प्रसाद कुलकर्णी यांचे 'प्रबोधनाची गरज' या विषयावर व्याख्यान आयोजित केले होते.

**१३ जानेवारी २००८ :**

**ग्रामीण मराठी साहित्य संमेलन :**

म.सा.प. इस्लामपूर शाखेच्या वतीने एकदिवसीय १६व्या ग्रामीण साहित्य संमेलनाचे आयोजन करण्यात आले होते. संमेलनाध्यक्ष डॉ. द. ता. भोसले (पंढरपूर) हे होते. या संमेलनाचे उद्घाटन कवी डॉ. वि. रा. तोडकर यांनी केले. स्वागताध्यक्ष प्राचार्य शिवाजीराव कुंभार होते.

या संमेलनात 'महानुभवी साहित्याने मराठी साहित्याला काय दिले ?' या विषयावर डॉ. कन्हैय्या कुंदप यांच्या अध्यक्षतेखाली परिसंवादाचे आयोजन करण्यात आले होते. शेवटी निमंत्रितांचे कविसंमेलन झाले.

**डॉ. विवेक देशपांडे स्मृतिदिन :**

म. सा. प. चे आजीव सदस्य डॉ. विवेक देशपांडे यांच्या स्मृतिदिनाच्या निमित्ताने प्राचार्य जी. व्ही. कुलकर्णी यांचे 'आम्ही असे' या विषयावर (महाराष्ट्र संस्कृती दर्शन) व्याख्यान आयोजित केले होते.

**डॉ. सरोजिनी बाबर यांना श्रद्धांजली** वाहण्यात आली.

**प्रा. दशरथ पाटील,**
**अध्यक्ष**



अनुक्रमणिका

## डोंबिवली शाखा

**२ डिसेंबर २००७ :**

**माधव जुलिअन स्मृतिदिन :**

प्रा. रमेश कोकाटे यांचे व्याख्यान झाले. प्रा. प्रभात शिरसेकर यांनी सूत्रसंचालन केले. सौ. मेघा कुलकर्णी यांनी आभार प्रदर्शन केले.

**२८ ते ३० जानेवारी २००८ :**

संतश्रेष्ठ तुकाराम महाराज व राष्ट्रसंत रामदास स्वामी यांच्या चतुःशताब्दी जयंती वर्षानिमित्त व्याख्यानमाला झाली. प्रा. प्रतिभा बिबळकर यांचे 'साखर माणसे', दिवाकर गंधे यांचे 'सोपानदेव चौधरी आणि मराठीतील साहित्यिक' आणि सौ. प्रज्ञा गोखले यांचे 'ऐका दगडाची गोष्ट' या विषयावर व्याख्याने झाली.

**१५ मार्च २००८ :**

'केशव मेश्राम व्यक्ती आणि साहित्य' या विषयावर डॉ. गीता मांजरेकर यांचे व्याख्यान झाले. प्रा. वि. गो. नंद अध्यक्षस्थानी होते. या व्याख्यानास श्रीमती नंदा मेश्राम आवर्जुन उपस्थित होता. श्री. शिरसेकर यांनी सूत्रसंचालन केले. डॉ. धनश्री साने यांनी आभार मानले.

**कार्यवाह**

## शहापूर शाखा

**६ एप्रिल २००८ :**

अनिल पारगावकर यांचा 'प्रेयसीच्या शोधात' हा कार्यक्रम आयोजित करण्यात आला. श्री. प्रशांत फुले, श्री. पंडित यांनी कार्यक्रमाचे आयोजन केले.

**कार्यवाह**

## उल्हासनगर शाखा

**२७ फेब्रुवारी २००८ :**

कवी कुसुमाग्रज जन्मदिनानिमित्त हस्तलिखित स्पर्धा व समरगीतगायन स्पर्धा आयोजित करण्यात आली. ४० शाळांच्या प्रतिनिर्धींनी स्पर्धेत भाग घेतला.

**६ एप्रिल २००८ :**

गुढीपाडव्यानिमित्त उल्हासनगर मध्ये स्वागत यात्रेचे आयोजन करण्यात येते. शाखेचे अध्यक्ष डॉ. श्रीकांत देशपांडे व अन्य पदाधिकारी यांनी या स्वागतयात्रेचे स्वागत केले.

**कार्यवाह**

## सोलापूर शाखा

**२७ फेब्रुवारी २००८ :**

**कुसुमाग्रज जयंती :**

'मराठी मायबोली दिन' साजरा करण्यात आला. प्रा. डॉ. संजय लांडगे यांचे व्याख्यान झाले. स्वागत व प्रास्ताविक बी. ए. मुल्ला यांनी केले. परिचय व सूत्रसंचालन प्रेमचंद्र मेने यांनी केले व आभार अरविंद जोशी यांनी मानले. श्री. नागेश सुरवसे अध्यक्ष होते.

**८ मार्च २००८ :**

महिला दिन : 'स्त्री' या विषयावर काव्यलेखन स्पर्धा आयोजित केली होती. ३२ महिलांनी भाग घेतला. सौ. सुनेत्रा पंडित यांनी परीक्षण केले. सौ. शांता क्षीरसागर, कविता मुरूमकर, रेखा शहा यांना पारितोषिके मिळाली.

**१ एप्रिल २००८ :**

**बाबुराव बागुल श्रद्धांजली :**

डॉ. गो. मा. पवार, प्रा. निशिकांत ठकार, योगिराज वाघमारे, डॉ. सुहास पुजारी, दत्ता गायकवाड, अरुण खोरे इ. मनोगते व्यक्त केली. सूत्रसंचालन प्रेमचंद्र मेने यांनी केले.

**कार्यवाह**

## धुळे जिल्हा शाखा

**३० डिसेंबर २००७ :**

**कै. प्रा. मोरे स्मृतिदिनानिमित्त :**

प्रा. अनिल सोनटक्के यांचे साहित्य आणि साहित्यिकांचे व्यक्तिमत्त्व या विषयावर व्याख्यान झाले.

**२४ जानेवारी २००८ :**

भाऊ देशपांडे स्मृतिदिनानिमित्त कवीसंमेलन झाले.

**२७ फेब्रुवारी २००८ :**

स्वा. सावरकरांचे आत्मार्पण व कवी कुसुमाग्रजांच्या जयंती निमित्ताने प्रा. डॉ. सुषमा दाते यांचे स्वा. सावरकर व कवी कुसुमाग्रज यांच्या कवितेतील राष्ट्रप्रेम या विषयावर व्याख्यान झाले. अध्यक्षस्थान प्रा. डॉ. मु. ब. शहा यांनी भूषविले. प्रास्ताविक कार्याध्यक्ष डॉ. पवार यांनी केले. आभार श्री. मोराणकर यांनी मानले.

**कार्यवाह**

❖❖❖



अनुक्रमणिका

## महाराष्ट्र साहित्य परिषद १०२ वा वर्धापनदिन सोहळा



२६ मे २००८ रोजी म.सा.प. पारितोषिक वितरण समारंभाचे अध्यक्ष संगणकतज्ज्ञ डॉ. विजय भटकर यांचा सत्कार कार्याध्यक्ष डॉ. वि.भा. देशपांडे यांच्या हस्ते झाला. त्याप्रसंगी व्यासपीठावर डावीकडून कोषाध्यक्ष श्री. ह.ल. निपुणगे, प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य, डॉ. भटकर, अध्यक्ष प्रा. द.मा. मिरासदार.




२७ मे २००८ वर्धापन दिनानिमित्त म.सा.प. - गौरव पुरस्कार डॉ. मु.श्री. कानडे यांना प्रमुख पाहुणे फादर फ्रान्सिस दिब्रिटो यांच्या हस्ते प्रदान केला. त्याप्रसंगी व्यासपीठावर डावीकडून कोषाध्यक्ष श्री. ह.ल. निपुणगे, कार्याध्यक्ष डॉ. वि.भा. देशपांडे, अध्यक्ष प्रा. द.मा. मिरासदार आणि डॉ. भीमराव कुलकर्णी-कार्यकर्ता-पुरस्कार विजेते बेळगावचे श्री. पं.ग. कुलकर्णी.

Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : April to June 2008
Registered with the register of Newspaper for India under No. 6398/57




प्रेषक — बुक-पोस्ट

प्रमुख कार्यवाह,

**महाराष्ट्र साहित्य परिषद,**

टिळक रस्ता, पुणे-४११०३०.

दूरभाष : ०२०-२४४७५९६३.